विकास प्रकाशन

ऐतिहासिक

# विकासवाद

द. कृ. देशपांडे

१९४२ मार्च

॥=

# अनुक्रमणिका



# विषयप्रवेश : : १

सोंगट्याच्या खेळात कवड्या हातात घेऊन भिरकावून दिल्या म्हणजे कोणता डाव पडेल हे जसं अनिश्चित, किंवा पत्ते पिसून वाटल्यानंतर कोणते कोणीकडं जातील हे सांगणं जसं अनिश्चित, त्याचप्रमाणं इतिहासाची गति अनिश्चित असा बहुतेकांचा समज होता. म्हणून इतिहास म्हणजे कालरूपी क्रीडापटावर भिन्नव्यक्तिरूपी सोंगट्यांच्या द्वारे खेळला जाणारा खेळ होता. अलेक्झांडर, अशोक, नेपोलियन, लेनिन, महात्मा गांधी, या व्यक्ती अमक्याच काली व अमक्याच देशांत कां जन्माला येतात, त्यांना लोकांचं पाठबळ कां व कसं मिळतं, व्यक्तिनिष्ठ पराक्रमानेच या व्यक्ती अजरामर होऊं शकतात किंवा ज्या कालपरिस्थितीत त्या व्यक्ती जन्मतात व वाढतात त्यानाहि त्याचं श्रेय आहे, इत्यादि प्रश्नांची उत्तरं इतिहासानं दिली पाहिजेत. याशिवाय कोट्यवधि जनतेंत एखादीच विभूति असते. इतिहास म्हणजे या एकट्या विभूतीचा इतिहास नसून कोट्यवधि जनतेचा इतिहास होय, हे लक्षात ठेवावयास पाहिजे. 'इति-ह-आस' म्हणजे असं पूर्वी होतं, या तीन शब्दांपासून 'इतिहास' बनला आहे. आपल्या पूर्वजांच्या प्रगतीच्या मार्गात कोणत्या विपत्ती आल्या, त्या विपत्तींवर त्यांनी कसा

विजय मिळविला, इत्यादि गोष्टींचा बोध करून देऊन, ' पुढच्यास ठेच मागाच्या शहाणा ' या न्यायान ऐहिक सुखप्राप्तीच्या मार्गातील संकटावर विजय मिळवून जीवन अधिकाधिक निष्कंटक व सुखमय करावयाच हाच इतिहासाचा हेतु आहे. हा कार्यभाग जर इतिहासाकडून होत नसेल, तर इतिहासाचा अभ्यास करण व्यर्थ आहे. अमुक राजाला किती बायका होत्या व किती वेश्या होत्या, अमुक राणीला किती पती होते, त्याचा राजवाडा किती मोठा होता, स्वतःचा राजवाडा बाधण्यासाठी त्यानी किती शहर जमीनदोस्त केली, त्याचे जडजवाहीर किती होते, त्याच्या खुषमस्कऱ्याची नाव काय होती, आपल्या जुलमी कारकीर्दीचे स्तुतिपाठ गाण्यासाठी त्यानी नामांकित कवीना कस भाडयान ठेवल, इत्यादि नवलकथाचा संग्रह म्हणजे इतिहास होऊन बसला आहे. राजाच्या वंशावळी व लढायाच्या तारखा यानी इतिहासाला अत्यंत शुष्क बनविल आहे.

गाधी पचा नेसतात, खजूर खातात, शेळीच दूध पितात, मौनव्रत धारण करतात व उपवास करतात, ही का आपली राजनीति ? नेहरू श्रीमत घराण्यात जन्माला आले, केव्हा केव्हा धूम्रपान करतात, व्यायाम घेतात, पोहतात, हा का आपला इतिहास ? चेंबर्लेन मासे पकडण्यासाठी अमुक तलावावर जातो, अमुक प्रकारचे कपडे घालतो, नेहमी छत्री घेऊन हिंडतो, ही का आपली राजनीति ? गाधी, नेहरू व चेंबर्लेन हे आपल्या खाजगी जीवनात कसे राहातात याचा इतिहासाशी काय संबंध ? त्याच्या ज्या कार्यांनी समाज उन्नतीच्या किंवा अवनतीच्या मार्गाला लागला, तेवढयाशीच इतिहासाला कर्तव्य आहे. नाही तर गाधींचा पचा काय किंवा चेंबर्लेनची छत्री काय, याना इतिहासात महत्त्व असेल तर ते लोकाची फसवणूक करण्याच्या दृष्टीनच होय. गांधींच नाव घेतल्याबरोबर पंचा, उपवास, खजूर, शेळी इत्यादि गोष्टी एकदम डोळ्या-

समोर येतात, चेंबर्लेन म्हटल्याबरोबर छत्रीची आठवण होते, रवींद्रनाथ व शॉ म्हटल्याबरोबर पांढऱ्या शुभ्र दाढ्याची दृश्य समोर येतात, बाल्डविन् म्हटल्याबरोबर तोंडात पाइप घेतलेला एक स्थूल गृहस्थ नजरेसमोर येतो. पंचा, छत्री, दाढी, पाइप, ही जनतेच्या मनात आपल्याविषयी जिज्ञासा उत्पन्न करून त्याची मन वेधून घेण्याची साधन होत.

ऐहिक सुखवृद्धीच्या दृष्टीन मानवजातीचा विकास आजपर्यंत कसा होत गेला, कोणत्या विभूतीनी या कार्यात मदत केली व कोणत्या खलपुरुषानी विघ्न आणली, निरनिराळ्या काळी उदरनिर्वाहाची व सुखसामुग्रीची काय साधन होती व त्याचा विकास कसा होत गेला याचा वृत्तात म्हणजे इतिहास.

आजपर्यंत मानवजातीचा विकास कसा होत गेला याच परीक्षण केल म्हणजे मनुष्यजातीच्या भवितव्याविषयी काही अनुमान बाधता येण्यासारखी आहेत. आगामी सकटाची पूर्वसूचना झाल्यामुळ मनुष्यजातीचा विकासपथावरील प्रवास सुखकर होण्याचा सभव आहे. हा प्रवास शक्य तितका सुकर होण हे मनुष्यजातीच्या विकासमार्गाच्या ज्ञानावर अवलंबून आहे हे ज्ञान सपादन करून विकासनियमाच उल्लंघन न होऊ देण हे चाणाक्ष शासकाच लक्षण आहे.

लढाया का होतात? जगातील पावणेदोनशे कोटी लोकाना पुरून उरण्याइतक अन्न उत्पादन करण्याची शक्ति असताना कोट्यवधि लोक उपाशी का मरतात? आज जगात असलेल्या लोकसंख्येपेक्षा किती तरी पट अधिक लोकसख्येला अन्नवस्त्र पुरविण्याच सामर्थ्य विज्ञानान मानवजातीला दिल असताना, कोट्यवधि लोक का उघडे पडतात! क्षय, कॅन्सर, इत्यादिसारख्या असाध्य रोगावर विजय मिळवून प्रत्यक्ष मृत्यूवरहि विजय मिळविण्याची आकांक्षा आधुनिक वैद्यविशारद बाळगत असताना, मलेरियासारख्या, जीवनाला फारशा अपायकारक

नसलेल्या रोगापासून असख्य लोक मृत्युमुखी का जातात ? वय उलटून गेलेल्या मनुष्याला पुनर्यौवनलाभ करून देण्याचे प्रयोग या जगांत होत असताना पिढ्यान्‌पिढ्यांच्या उपासमारीन ज्याच आयुर्मान पचविशीच्या आतबाहेर येऊन पोहचल आहे असे कोट्यवधि लोक परलोकाचा मार्ग का पत्करतात ! शेकडा दहा बारा लोकाना धड अक्षरओळखहि नसताना, शिक्षणविषयक पराकोटीच अष्टदारिद्र्य देशात पसरलेल असताना, शिक्षितान्ची बेकारी का निर्माण होते ? शिक्षणाच अपचन कस होत ! मलेरियासारख्या अत्यंत सुसाध्य रोगापासून असख्य लोक मरत असताना डॉक्टराच्या बेकारीसारखे चमत्कार होत असतात हे कशाच द्योतक आहे ?

आपल्या जीवनाशी सबद्ध असलेल्या अशा अनेक प्रश्नाची उत्तर जोपर्यंत इतिहास देणार नाही, तोपर्यंत इतिहासाविषयी लोकाच्या मनात अनास्थाच वास्तव्य करून राहील. हे इतिहासान सोडवावयाचे प्रश्न नसून प्रचलित राजनीतीचे आहेत अशी कुशका घेता कामा नये कारण राजनीति म्हणजे चालू इतिहास व इतिहास म्हणजे भूतकालची राजनीति.

तर असा इतिहास आपण शिकतो का ? आपण ज्याला इतिहास म्हणत आलो व जो शिकत आलो, त्यापासून वरील प्रश्नाची उत्तर आपल्याला मिळतात का ?

असा इतिहास आपण शिकत नाही व शाळा—कॉलेजातून तो शिकविला जात नाही. कारण शाळा आणि कॉलेज, ही लोकाना वास्तविक परिस्थितीच ज्ञान करून देऊन त्याच्या जीवनाच्या मार्गातील सकट दूर करण्यासाठी नसतात, मूठभर शासकवर्गाच्या स्वार्थाप्रीत्यर्थ बहुसंख्य दलित जनतेला राबविण्यासाठी निर्माण झालेली असतात. जनतेला अज्ञानात ठेवण्यात किंवा फार तर ज्ञानाभास निर्माण करून जनतेला फसविण्यातच त्याची स्वार्थसिद्धि असते. बहुजनसमाजाच्या परिश्रमान निर्माण झालेल्या

संपत्तीवर मूठभर लोकानी जीवन व्यतीत करावयाच, हे मूठभर लोक कोणत्या जातीचे हा प्रश्नच संभवत नाही. एका जातीचे असले तर जुल्म सुसह्य होतो व दुसऱ्या जातीचे असले तर दुःसह होतो अस थोडच आहे! 'दगडापेक्षा वीट मऊ' हा न्याय लागू पडण्याचा संभव आहे, पण ज्यान डोक फोडूनच घ्यावयाच असा निश्चय केला असेल त्याच्याच बाबतीत. एकंदरीत बहुजन-समाजाच्या अज्ञानातच भांडवलशाहीच्या स्वार्थसिद्धीला अवसर आहे. अशा अवस्थेत जे काही लोकशिक्षणाच्या तुटक्या फुटक्या प्रयोगाचे ढोंग चाललेले असते ते देखील लोकमताच्या भीती मुळ. एका विद्वानान म्हटल आहे: 'सहा वर्षे विश्वविद्यालयात शिकूनसुद्धा जर एखादा मनुष्य मूर्ख बनला नाही, तर तो मूळचाच शहाणा असला पाहिजे!'

दास्यवृत्तीच शिक्षण देणाऱ्या संस्थामधून शिक्षण घेऊन लोक पदवीधर बनतात आणि अशा शिक्षितब्रुवाकडून राष्ट्राच्या आकांक्षा पूर्ण न झाल्या तर काय आश्चर्य? अगोदरच पारतंत्र्यात असलेल्या गरीब लोकाच्या गुलामीच्या शृंखला दृढ करण्यासाठी हे शिक्षित लोक सत्ताधीशाच्या कामी येतात. आमचेच रक्तबांधव आमच्याच गळयाभोवतीचा गुलामीचा फास घट्ट करण्यासाठी सरसावतात, आमचीच आप्तेष्ट मंडळी आमच्याच स्वातंत्र्याच्या मार्गात विघ्न उत्पन्न करून आपला चरितार्थ चालविते. पुष्कळ दिवसाच्या गुलामीन आपण गुलाम आहो याचाहि आपणास विसर पडू लागतो व कुशिक्षणाच्या प्रभावान गुलामीलाच स्वातंत्र्य समजून आपल्या दास्यशृंखला आपणच आवळू लागतो. अशी परिस्थिति निर्माण झाली म्हणजे राष्ट्राच स्वातंत्र्य पूर्णपणे नष्ट झाल अस समजाव. अशा प्रसंगी लोकसत्ता हिंदुस्थानाकरिता अयोग्य आहे अस प्रतिपादणारे वीर (!) जन्माला येतात! हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळाल तर त्याच आम्ही कस रक्षण करू अशा कुशंका आपल्या मनात उत्पन्न व्हायला लागतात. सरहद्दप्रातातून अफ-

गाणानी, उत्तरेकडून रशियान व पूर्वेकडून जपानन स्वारी केली तर हिंदुस्थानच कस होईल, अशा प्रकारचे पराङ्मुखतेचे विचार मनात घेऊन, असलेली गुलामीच बरी, या पालुपदावर आपण येऊन पोहचतो. महात्मा गाधीनी म्हटल आहे. ' स्वतःच स्वातंत्र्य ज्यानी नष्ट केल अशा दास्यशृंखलाना स्वतः होऊन जेव्हा गुलाम कवटाळू लागतो, तेव्हा त्याच दास्यत्व परमावधीला पोहचल अस समजाव. '

अशा प्रकारचे गुलाम निर्माण करण ज्या सस्थाचा उद्देश आहे, त्याच सस्थामधून एखादा बडखोर वीर बाहेर पडतो. तो या शिक्षणक्रमाला न जुमानता आपल व्यक्तित्व कायम राखतो. त्याला मूर्ख बनविण्याचे प्रयत्न अयशस्वी ठरतात. आय सी. एस., आय एम्. एस., आय ई. एस. वगैरे शेकडो रुपये पगाराच्या नौकऱ्या म्हणजे देशातील सबध बुद्धिमत्तेला सपत्तीच्या बळावर विकत घेऊन स्वातत्र्यनिर्माणाच्या व राष्ट्रोद्धाराच्या कामी तिला निरुपयोगी ठरविण्याचा एक अत्यत प्रभावी कट आहे स्वातत्र्ययुद्धात भाग घेऊन राष्ट्रोद्धारार्थ आपल तनमनधन अर्पण करण हे ज्यानी आपल ध्येय ठरविल आहे, असे लोक जर सपत्तिरूप मायेच्या मोहाला बळी पडते, तर महात्मा गाधी आज कुठल्या तरी आफ्रिकेच्या कोपऱ्यात उपेक्षित राहिले असते, हिदुस्थान एका अनुपम स्वातत्र्यवीराला मुकला असता आणि बुद्धोत्तरकालातील अग्रगण्य महात्मा अस म्हटल्याबरोबर ज्याच्याकड आपण अगुलिनिर्देश करतो अशा एका महात्म्याला जग पारख झाल असत. जवाहरलालनी कोठे तरी न्यायाधीशाच्या अधिकारमदान स्वतःच्या उज्वल भवितव्यतेला इतिहासपटावरून हद्दपार केल असत व आज आपली मातृभूमि त्याच्या अमूल्य सेवेला अंतरली असती !

अशा विभूती प्रचलित शिक्षणक्रमाच्या चाकोरीतून बाहेर पडतात, हे शिक्षणाच्या प्रभावामुळ नसून त्याच्या कुप्रभावाला न जुमानता आपल वैशिष्ट्य कायम टेवतात म्हणून. प्रत्येक देशाच्या

दास्याविमोचनाच्या चळवळीमधून अशी उदाहरण सापडतील.

शाळा आणि कॉलेज यातील शिक्षणाची स्थिति अशी असल्यावर त्याच्याकडून खऱ्या इतिहासाविषयी जनतेला शिक्षण मिळेल अशी आशा करण व्यर्थ आहे.

तर इतिहास हा कसा शिकावयाचा ?

इतिहास हा जर सोंगट्याच्या डावासारखा किंवा पत्त्याच्या खेळासारखा प्राक्तनानुसारी असला, तर मग इतिहास अभ्यासण्याचे काहीच प्रयोजन नाही. जेथे मानवी प्रयत्नाला अवकाश असतो तेथंच पूर्वानुभवापासून लाभ करून घेता येतो. जेथे प्राक्तनाला प्राधान्य प्राप्त होत, तेथे प्रयत्नाला फाटा मिळतो. प्रयत्न आणि प्राक्तन याच्यात छत्तीसाचा आकडा आहे. बुद्धिबळ, टेनिस, बिलियर्डस, क्रिकेट इत्यादि खेळाची मदार मानवी कौशल्यावर अवलबून आहे. जसा खेळाडू अधिक कुशल असतो, तशी त्यास अधिक प्रवीणता सपादन करता येते. म्हणूनच या खेळात मनुष्य अनुभवामुळ अधिक नैपुण्य सपादन करू शकतो. पण पत्त्या–सोंगट्यात तशी परिस्थिति नाही. डाव पडण्यावर व पत्ते येण्यावरच खेळातील बहुतेक यशापयश अवलबून असत. मानवी प्रयत्नाला यात अतिस्वल्प अवकाश असतो. म्हणूनच पत्ते व सोंगट्या अकर्तृत्वशील व निर्बुद्ध लोकाच्या करमणुकीची साधन होऊन बसली आहेत. ब्रिजसारख्या पत्त्याच्या खेळात मानवी प्रयत्नाला थोडासा अवकाश उत्पन्न झाला, तेव्हा समाजातील सुबुद्ध लोकात तो खेळ आदरणीय ठरला. ‘ नो ट्रम्स ’–ना नलोजची जेव्हा तोड निघाली तेव्हा तर खेळातील प्राक्तनाचा अंश बराच कमी झाला व मानवी प्रयत्नाला अधिकतर अवकाश उत्पन्न झाला. पाच–तीन–दोन, लाडिस, तीनशे चार, प्रेसिडेंट ऑफ फूल्स इत्यादि पोरकट खेळापेक्षा ब्रिज व लिटरेचर आदरणीय का हे सहज समजण्यासारख आहे. पत्ते आणि सोंगट्यांच्या सारख्या देखील खेळांचे काही प्रकार सुबुद्ध समाजात आदरणीय आहेत. कारण

मूर्ख लोकांच्या निर्बुद्ध करमणुकीच्या मूळच्या स्वरूपातून बुद्धीला अवकाश असलेल्या रूपात ते स्थित्यंतरित झाले.

निर्बुद्ध लोकांचा पत्ते–सोंगट्यांचा खेळ जसा प्राक्तनाधीन असतो, तसा इतिहास नाही. इतिहासाच्या विकासाचे नियम आहेत. या नियमाप्रमाणे आजपर्यंत विकास होत आला. म्हणूनच भविष्याविषयी आपल्याला काही अनुमान बांधता येण्यासारखी आहेत.

इतिहासाचा विकास कसा होत गेला हा प्रस्तुत विषय आहे.

---

# विकासवाद : : २

## डायलेक्टिकल मटीरियालिझम्

इंग्रजीत ज्या विचारपद्धतीला किंवा ज्या तत्वज्ञानाच्या शाखेला ' डायलेक्टिकल मटिरियालिझम् ' असं म्हणतात तिला योग्य मराठी शब्दाचा अभाव असल्यामुळे ' विरोधविकासवाद ' इत्यादि गूढ दुर्बोध नावाच्या ऐवजी इंग्रजी नावच वापरण्याचा मोह अनावर होतो

डायलेक्टिकल म्हणजे काय ?

उणे दहा उष्णतामानाचा ( – 10 C ) एक बर्फाचा तुकडा घेऊन त्याला मंद उष्णता दिली म्हणजे त्याचं उष्णतामान क्रमानं वाढत जातं. हा जो उष्णतामानातला फरक तो उष्णतामापकयंत्राला व स्पर्शाला गोचर आहे. यंत्रानं समजण्यासारखा आहे. उष्णतेचं मान शून्य होईपर्यंत बर्फाच्या दृश्य स्थितीत काहीएक फरक न पडता उष्णतामान वाढत जातं. उष्णता दिल्यामुळं बर्फाच्या उष्णतामानात फरक पडतो. हा जो फरक, हे जे परिवर्तन, ते मानविषयक झालं.

शून्यावर उष्णतामान आल्यानंतर दिलेली उष्णता मानवर्धक मुळीच होत नाही. शून्यमानप्राप्तीनंतर दिलेली उष्णता मानपरिवर्तक होण्याऐवजी गुणपरिवर्तक होते. गुण परिवर्तन बर्फाचं

होऊं लागत. बर्फाचं घनत्व जाऊन त्याला द्रवत्व येऊं लागतं शून्यमानाच्या बर्फाचं शून्यमानाचं पाणी होतं. मानपरिवर्तन थांबून केवळ गुणपरिवर्तन चालू असतं.

उणे दहापासून शून्यापर्यंत जे परिवर्तन घडलं ते मानपरिवर्तन, 'क्वान्टिटेटिव्ह चेंज.' घन बर्फाचं द्रव पाणी होणं, हे गुणपरिवर्तन, किंवा 'क्वालिटेटिव्ह चेंज.'

इतिहासाच्या भाषेत मानपरिवर्तन म्हणजे उत्क्रांति व गुण परिवर्तन म्हणजे क्रांति.

रसायनशास्त्राच्या भाषेत अशाच प्रकारच्या प्रक्रियांना साधारणपणे 'फिजिकल चेंज' व 'केमिकल चेंज' म्हणता येईल.

क्रांति, 'केमिकल चेंज,' व प्रस्तुत निबंधातील 'डायलेक्टिकल चेंज' हे निरनिराळ्या शास्त्रांतील गुणपरिवर्तनबोधक निरनिराळे शब्द आहेत.

बर्फाचं घनत्व नष्ट होऊन त्याला द्रवत्व येणं हं गुणपरिवर्तन, 'क्वालिटेटिव्ह चेंज,' म्हणजेच 'डायलेक्टिकल चेंज' होय.

शून्यमानाच्या पाण्याला उष्णता दिली म्हणजे मान वाढत जातं ते शंभरापर्यंत. ही झाली उत्क्रांति किंवा मानपरिवर्तन. शतमानाच्या पाण्याला उष्णता दिली तर मानपरिवर्तन न होता गुणपरिवर्तन होऊं लागतं. पाण्याचं द्रवत्व नष्ट होऊन त्याला वायुरूप प्राप्त होतं. हे गुणपरिवर्तन, क्रांति किंवा 'डायलेक्टिकल चेंज.'

मानपरिवर्तन एका विशिष्ट मर्यादेला गेलं म्हणजे गुणपरिवर्तन आवश्यक होतं. त्या पदार्थाच्या अस्तित्वालाच आवश्यक होऊन बसतं.

* * * *

जगातील सर्व दृश्य पदार्थ एलेक्ट्रान्स व प्रोटॉन्स या दोन मूलतत्वांपासून बनलेले आहेत असं शास्त्रज्ञ सांगतात. जगांत असलेले असंख्य एलेक्ट्रॉन्स एकसारखेच आहेत व असंख्य प्रोटॉन्सही एकमेकांसारखेच आहेत. पण यांच्याच रचनासंयोगादि-

विशेषामुळ मूलभूत गुणधर्म नष्ट होऊन शास्त्रज्ञाना माहीत असलेल्या भिन्नधर्मगुणविशिष्ट ऱ्याण्णव मूलपदार्थांची उत्पत्ति होते. हा ' डायलेक्टिकल चेंज ' किंवा गुणपरिवर्तन

सोडियम हा अत्यत ज्वालाग्राही असा घन मूलपदार्थ. क्लोरीन हा पिवळसर रगाचा घाणेरडा वायु या दोघाच्या सयोगापासून जीवनाला अत्यत उपयोगी अस मीठ तयार होत. जीवनाला हानिकारक जे पूर्वीचे मूलपदार्थांचे गुणधर्म ते नष्ट होऊन सयोगजन्य पदार्थात जीवनोपयोगित्वाचा नवा गुण उत्पन्न होतो रासायनिक भाषेत याला ' केमिकल चेंज ' म्हणतात.

मूल पदार्थांच्या विविध प्रकारच्या संयोगामुळ व रचनाविशेषामुळ या दृश्य सृष्टीतील नानाधर्मगुणविशिष्ट पदार्थ उत्पन्न झाले आहेत. संख्यारचनादिविशेषामुळ अनेक नूतन गुणाचा प्रादुर्भाव होत जातो. हैड्रोजन व कार्बन इत्यादि मूलपदार्थांपासून बनलेली साखर गोड असते, एरंडेल विरेचक असत, घासलेट ज्वालाग्राही असत, स्पिरिट विस्फोटक असत. असे असंख्य संयोग होऊन असख्यगुणयुक्त सृष्टि बनली आहे.

गति, जीव, विचारशक्ति, हे देखील सयोग संख्यारचनादिविशेषामुळ उत्पन्न झाले आहेत अस जर एखादा शास्त्रज्ञ वरील आधारावरून प्रतिपादन करू लागला, तर सनातनी मनाला जबरदस्त धक्का बसल्यावाचून राहाणार नाही. संयुक्त होणाऱ्या पदार्थातील मूळचे गुण नष्ट होऊन नवीन गुणाचा सयोगजन्य प्रादुर्भाव जर संभवतो, तर ' जड समजल्या जाणाऱ्या ' सृष्टीतून सयोगरचनादिविशेषामुळ चेतनाधर्मविशिष्ट सृष्टीचा प्रादुर्भाव तितकाच सभवनीय आहे. एवढ पटल म्हणजे गति, जीव, विचारशक्ति, हे जड पदार्थांच्या विकासमार्गावरील निरानिराळे टप्पे ठरतात व मनुष्यामधील विचारशक्ति इत्यादि निर्माण करण्यास ईश्वराच्या अस्तित्वाची गरज भासेनाशी होते.

' जड समजल्या जाणाऱ्या ' असा शब्दप्रयोग वर आलेला

आहे. जड या शब्दानं गतिहीनत्वाचा बोध कोणीहि करून घेऊ नये. कारण गतिहीन या अर्थी जड असा पदार्थ या अलम दुनियेत नाही. या ब्रह्मांडातील सर्व वस्तु निरंतर गतिमय आहे, हे आधुनिक शास्त्रज्ञांना तर पटतच, पण आपले पूर्वज जे विद्वान ऋषिमुनी होऊन गेले, त्यांना देखील हे मान्य होत, एवढच नव्हे, तर जेव्हा इतर भूप्रदेशातील लोक वन्यपशूप्रमाणे आपल जीवन व्यतीत करीत होते व आगामी सुधारणेचा मागमूसही नव्हता, अशा अतिदूर प्राचीनकाळी आर्यावर्तातील विद्वान ऋषींनी या ब्रह्मांडरूपी चचल बालकाच नामकरण जगत्, ससार, इत्यादि अत्यंत सार्थ नावानी केल. ‘ परिवर्तिनि संसारे मृतः को वा न जायते ’ या श्लोकार्धातील ‘ परिवर्तिनि संसारे ’ या शब्दप्रयोगावरून ससाराच गतिमत्व, परिवर्तित्व सिद्ध होत. जगताच, संसाराच गतिमत्व सिद्ध करण्याकरिता ऋषिमुनींच्या आधाराची मुळीच गरज नाही. ज्याला सस्कृताच थोड तरी ज्ञान आहे, त्याला हे सहज समजण्यासारख आहे की, जगत्संसारादि शब्दांची उत्पत्तीच गत्यर्थक धातूपासून झालेली आहे. म्हणून जगत् गतिमान आहे, ससार परिवर्तनशील आहे, असे वाक्प्रयोग करण म्हणजे पुनरुक्तीचा दोष पदरात घेण आहे. दिवसानुदिवस वाढत चाललेल्या सस्कृत भाषेच्या आपल्या अज्ञानामुळ ‘ पिवळा पीतांबर ’ हा शब्दप्रयोग जसा रूढ झाला, तसेच वरील शब्दप्रयोग रूढ झाले आहेत. नाही तर संसार, जगत् हे शब्द वापरल्यानंतर ते गतिमान आहे हे सांगावयाची जरूर नाही.

‘ मटीरियालिझम् ’ या शब्दाचा मराठीत बोध करून घेण कठीण आहे. ‘ मटीरियालिझम् ’ ला जडवाद अस म्हणता येईल. पण जड या शब्दानं दिशाभूल न होऊ देता जडत्व म्हणजे गतिहीनत्व नव्हे हे पक्क लक्षात ठेवल पाहिजे. सर्वच पदार्थ गतिमान आहेत. सूर्यमडलात ज्याप्रमाण पृथ्वी, मगळ, बुध, शनि इत्यादि ग्रह सूर्याभोवती नित्य फिरत असतात, त्याचप्रमाण मूलपदार्थांच्या

परमाणूमध्ये एलेक्ट्रॉन्स व प्रोटॉन्स यानी युक्त असलेल्या मध्या-भोवती एलेक्ट्रॉन्स फिरत असतात. मूलपदार्थांचे परमाणू म्हणजे लहान लहान सूर्यमंडळच आहेत अस म्हणावयास हरकत नाही.

*  *  *  *

उणे दहापासून शून्यापर्यंत बर्फाच उष्णतामान वाढत जात, ही उत्क्रांति, व मग बर्फाच पाणी होत—बर्फाचा घनत्व हा गुण जाऊन त्याला द्रवत्व प्राप्त होत ही क्रांति ( डायलेक्टिकल चेंज ). बर्फाच्या उष्णतामानात फरक क्रमान पडत जातो पण डायलेक्टिकल चेंज किंवा क्रांति याचा विशेष हा की, ती एकदम घडून येतात. बर्फाच उष्णतामान जेव्हा वाढत, तेव्हा सूक्ष्म यंत्र असल्यास एका अंशाच्या शंभराव्या भागान सुद्धा वाढत असलेल उष्णतामान आपल्याला कळू शकेल. उष्णतामान क्रमान वाढत, पण ' डायले-क्टिकल चेंज, ' म्हणजेच बर्फाच पाणी होण किंवा पाण्याची वाफ होण या क्रमनिरपेक्ष क्रिया आहेत. बर्फाच पाणी क्रमान होत नसत, एकदम होत. बर्फ हा घन पदार्थ व पाणी हा द्रव पदार्थ. घनत्व जाऊन द्रवत्व जे येत ते एकदम येत. दगडासारखा घट्ट-पणा जाऊन एकदम द्रवत्व येत. या गुणपरिवर्तनात क्रमाचा अभाव आहे. दुधाची बासुदी किंवा खवा करताना दूध हे क्रमान घट्ट होत जात. त्याच द्रवत्व क्रमान कमी होत. पण बर्फाच पाणी होताना किंवा पाण्याचा बर्फ बनताना घनत्व व द्रवत्व मुळीच क्रमान कमी होत नाहीत. बर्फाच द्रवत्व क्रमान कमी व्हायच म्हणजे दगडासारखा घट्टपणा जाऊन त्याचा मेणासारखा पदार्थ बनावयास पाहिजे, नंतर पिठल्यासारखा, नंतर बासुदीसारखा व नंतर पाण्यासारखा द्रव पदार्थ बनावयास पाहिजे. पण असा क्रम बर्फाच्या द्रवीभवनात आढळून येत नाही. त्याचप्रमाण पाण्याची जेव्हा वाफ होते, ती एकदम होते. या क्रियेतहि क्रमाभाव आहे. द्रव पदार्थ एकदम वायुरूप बनतो. हा जो क्रमाचा अभाव 'डायले-क्टिल चेंज' मध्ये दृष्टीस पडतो, तेच क्रांतीच वैशिष्ट्य होय.

उत्क्रांतीत क्रम असतो, क्रांतीत क्रमाचा अभाव असतो.

* * * *

गणितशास्त्राच्या भाषेत, बिंदूला डायमेन्शन्स नसतात म्हणजे लांबी रुंदी वगैरे नसते.

विशिष्ट दिशेन गतिमान होणाऱ्या बिंदूपासून सरल रेषा उत्पन्न होते. ( वन् डायमेन्शनल स्पेस ).

विशिष्ट दिशेन गतिमान होणाऱ्या सरल रेषेपासून क्षेत्र उत्पन्न होत ( टू डायमेन्शनल स्पेस ).

विशिष्ट दिशेनं गतिमान होणाऱ्या क्षेत्रापासून व्याप्ति किंवा ' थ्री डायमेन्शल स्पेस ' उत्पन्न होते.

गतिधर्मामुळ बिंदूच्या या निरनिराळ्या दशा उत्पन्न झाल्या.

* * * *

बेरजेत क्रांति होऊन गुणाकाराचा जन्म झाला. लांब बेरजाचा जेव्हा कंटाळा येऊ लागला, तेव्हा गुणाकाराची युक्ति निघाली. लांब सख्याचा गुणाकार जेव्हा असह्य होऊ लागला तेव्हा लॉगॅरिथम्सच्या मदतीन गुणाकाराच स्वरूप पुनः बेरजेच होऊ लागल.

पन्नासदा वजाबाकी करण्याचा त्रास चुकविण्याकरिता भागाकाराची रीत निघाली. भागाकार म्हणजे वजाबाकीची सुधारलेली अवस्था. पण लॉगॅरिथम्सच्या मदतीन भागाकाराच स्वरूप पुनः वजाबाकीच होऊ लागल.

बीपासून झाड व झाडापासून बी; याचप्रमाण बेरजेचा गुणाकार व गुणाकाराची बेरीज; वजाबाकीचा भागाकार व भागाकाराची वजाबाकी; ही विकासवर्तुळ पाहून योग, प्रतियोग, सयोग इत्यादि शास्त्रीय गूढगुंजनाची आठवण झाल्याविना रहात नाही.

* * * *

एखाद्या खंदकावरून उडी मारावयाची असली म्हणजे मनुष्य पंधरा वीस हात माग जातो. सुरवातीला तो हळू धावतो व मग जसा खंदक जवळ येत जातो तसा त्याचा वेग वाढत जातो आणि उडी

मारण्याच्या क्षणी, जमिनीपासून त्याचे पाय अलग होतात त्या क्षणी, वेग त्याच्या सामर्थ्याच्या परमावधीला पोहचलेला असतो. उडी मारण्याच्या पूर्वी जेव्हा स्टार्ट घेतला जातो, त्या क्षणापासून तो प्रत्यक्ष उडी मारण्याच्या क्षणापर्यंत वेग क्रमान वाढत जातो. उडी मारण्याच्या क्षणापर्यंत वेगात क्रमान वाढ होण याशिवाय धावण्याच्या क्रियेत काहीएक फरक घडून येत नाही. वेगात वाढ होण हा ' क्वांटिटेटिव चेंज ', मानपरिवर्तन. यानतर ज्या क्रियेमुळ खदक ओलाडता येतो ती क्रिया धावण या नावान सबोधली न जाता उडी या नावान संबोधली जाते. कारण या ठिकाणी क्रियेत गुणपरिवर्तन घडून येत. उडी मारण्याची तयारी, म्हणजे ' स्टार्ट ' घेऊन उडी मारण्याच्या क्षणापर्यंत क्रमान वेग वाढविण, ही उत्क्रांति आणि प्रत्यक्ष उडी मारण्याची क्रिया म्हणजे क्रांति. स्टार्ट घेतल्याशिवाय उडी जाण शक्य नाही, म्हणजेच उत्क्रांतीशिवाय क्रांति शक्य नाही. स्टार्ट घेण व उडी मारण या दोन्ही परस्पर पूरक क्रिया आहेत त्याचप्रमाण उत्क्रांति व क्रांति या एकमेकींच्या विरोधी नसून पूरक क्रिया आहेत.

* * * *

**रसिक नव्हे**—

१ एका चाळीत एक गाणारी बाई रहात असे.

२ तिच्या सगतीन शेजारचे लोक बेजार झाले

३ पहिला माळा खाली झाला.

४ दुसरा माळा खाली झाला.

५ तिसरा माळा खाली झाला.

६ फक्त तळमजल्यावर एकच बिऱ्हाडकरू अजून होता; हाच माणूस रसिक असावा अस त्या गाणाऱ्या बाईला वाटल.

७ पण हाय !

८ तो बहिरा होता.

( नवयुग १३ ऑक्टोबर ४० )

पहिल्या वाक्यात वस्तुस्थिति वर्णिली आहे. दुसऱ्या वाक्यात तिच्या गाण्यामुळ होणारा उपद्रव वर्णिला आहे. तिसऱ्या, चौथ्या व पाचव्या वाक्यात उपद्रवाचा क्रमान कसा विकास होत गेला हे वर्णिल आहे. एवढ्या उपद्रवाला न जुमानता तळमजल्यावर ठाण देऊन बसणारा, रसिक असला पाहिजे हे ओघानच आल. सातव्या वाक्यापर्यंत क्रम आहे, ओघ आहे. ही गोष्टीतील उत्क्रांति झाली. आठव्या वाक्यामुळ कल्पनेला एकदम धक्का बसतो. वाचकान त्या गृहस्थाविषयी बांधलेल अनुमान खोट ठरत. एका वाक्यात गोष्ट आटपते. शेवटच्या वाक्यान कथेचा क्रम तुटतो. त्या वृद्ध माणसाविषयीच्या आपल्या कल्पनेत क्रांति घडून येते.

गोष्टीतील कल्पनेच्या उत्क्रांतीला सात वाक्य लागली. या कल्पनेत क्रांति घडवून आणण्यास एकच वाक्य पुरे झाल. उत्क्रांति ही मंदगति असते, क्रांति ही शीघ्रगति असते.

गोष्टीतील कल्पनेची उत्क्रांति व क्रांति हे भाग निराळे केले तर त्याना मुळीच अर्थ उरणार नाही. गोष्ट लिहिणाराचा हेतु सिद्धीस जाणार नाही. उत्क्रांति व क्रांति हे दोन्ही भाग एकत्र करून क्रमान वाचल्यानच वाचकाला आश्चर्याचा गोड धक्का बसतो व लेखकाचा हेतु तडीस जातो.

उत्क्रांति व क्रांति अत्यत भिन्न व परस्परपूरक आहेत, त्याना परस्परनिरपेक्ष अस अस्तित्व नाही.

आश्चर्याचा असा गोड धक्का देण्यासाठीच असभाव्यतेचा आरोप सहन करून ‘ पुण्यप्रभावा ’ तील वृंदावन वसुधरेच्या पातिव्रत्याला शरण जातो, ओ हेन्रीच्या ‘ गिफ्ट ऑफ मॅगी ’ मधील नायकनायिका घड्याळाचा व केसाचा विक्रय करतात, व ‘ बंधन-’ मधील गौरी शुद्धीवर येते.

   

जागर्ति लोको ज्वलति प्रदीपः,
सखीजनः पश्यति कौतुक मे
मुहूर्तमात्र कुरु कात धैर्यम्
–बुभुक्षितः किं द्विकरेण भुङ्क्ते ?

लोक जागे आहेत, दिवा जळत आहे व माझ्या मैत्रिणी माझी टिंगल उडविण्याकरिता टपून बसलेल्या आहेत, थोडा वेळ धैर्य धर. फार भूक लागली तरी दोन हातानी का कोणी जेवतो ?

सारासार विचार नष्ट झालेल्या आपल्या प्रियकराला कोणी चतुर रमणी वरीलप्रमाण विनवीत आहे. पहिल्या तीन चरणात भोवतालची विसगत परिस्थिति तिन वर्णन केली आहे व चौथा चरण हा सुभाषितात्मक आहे. चौथ्या चरणातील वर्ण्य विषय व योजलेले शब्द हे पहिल्या तीन चरणाहून अत्यत भिन्न आहेत चौथ्या चरणातील उपमेमुळ श्लोकाला जो एक ठसकेबाजपणा आला आहे, तो, ' कामाध मनुष्यान तारतम्य ठेवून वागाव ' अशा अर्थाचा एखादा चरण कवीन घातला असता, किंवा मन-मानेल तशी आचकट विचकट भाषा जरी वापरली असती, तरी आला नसता. वेगात जाणाऱ्या गाडीला एकदम ब्रेक लागला किंवा लक्षाधीश मनुष्य सट्ट्यामुळ एकदम भिकारी बनला किंवा कगाल लॉटरीमुळ लक्षाधीश झाला म्हणजे जी अनुभवाची तीव्रता मानवी मनाला जाणवते, त्याच तीव्रतेचा अनुभव वरील श्लोकाचे पहिले तीन चरण वाचून चौथा चरण वाचला म्हणजे येतो.

पहिल्या तीन चरणात उत्क्राति आहे, चौथ्या चरणात क्राति आहे.

---

# लोकशाही : : ३

## जगदारंभीचा साम्यवाद

पाशवी दशा अतिक्रात करून, जेव्हा मानवान स्व-रूप धारण केल व जेव्हा त्याच्यात मानवतानिदर्शक अशा बुद्धीचा प्रादुर्भाव झाला, तेव्हा निसर्गनिर्मित खाद्य कदमुळ, फळ आणि मास याच्यावर त्याचा उदरनिर्वाह होत असला पाहिजे. अशा अवस्थेत त्याला असंख्य कष्ट उपभोगावे लागत असले पाहिजेत. शिकारीच्या आणि कंदमूळाच्या प्राप्तीच्या अनिश्चिततेमुळ केव्हा केव्हा उपाशी राहावयाची देखील त्याच्यावर पाळी येत असली पाहिजे. ऊन, पाऊस, थडी, वारा यापासून सरक्षण करण्याची साधन नसल्यामुळ त्याच जीवन अत्यत कष्टमय होत असल पाहिजे.

या सर्व नैसर्गिक सकटावर विजय मिळविण्याकरिता मनुष्याला बुद्धीची देणगी मिळाली होती. किंवा सकटापासून आत्मसंरक्षण करण्याच्या प्रबळ इच्छेमुळ बुद्धीचा प्रादुर्भाव होऊन पशुच मनुष्यकोटीला पोहचला होता. मनुष्य कृत्रिम साधनानी शरीरसरक्षण करू लागला. थंडीपासून शरीराच संरक्षण करण्यासाठी तो वल्कलाचा उपयोग करू लागला. निसर्गनिर्मित अन्नावर संतुष्ट न राहता कृत्रिम रीतीन अन्न उत्पन्न करण्याची कला त्यान शोधून काढली. निसर्गावर याप्रमाण तो विजय मिळवीत चालला.

पशु–वनस्पतींची तशी स्थिति नव्हती. बुद्धीच्या अभावी पोषणाकरिता त्याना निसर्गावरच अवलंबून राहाव लागे. पृथ्वीच्या ज्या भागात त्यानी अनुकूल परिस्थिति लाभली त्या भागात ते वाढले व जेथे प्रतिकूल परिस्थिति लाभली तेथे ते नष्ट झाले किंवा त्या परिस्थितीला योग्य अशा रूपवेषात अतिक्रांत झाले. पृथ्वीच्या पाठीवर वनस्पतींची व रानटी जनावरांची हवामाना-प्रमाण कटिबंधानुसार वाटणी झालेली जी आढळते ती याच कारणामुळ. उष्ण कटिबंधातले प्राणी व वनस्पति शीतकटिबंधात आढळण शक्य नाही व शीतातले उष्णातहि आढळण शक्य नाही

पण मनुष्य असा परिस्थितीच्या अधीन नव्हता. कृत्रिम उपायानी तो आपल संरक्षण करण्यास समर्थ होता. म्हणूनच तो आज सर्वव्यापक झाला आहे मनुष्याला थंडीची भीति नाही कारण तो उत्तर ध्रुवाजवळ बुद्धीच्या प्रभावान निवासयोग्य वातावरण निर्माण करू शकतो. त्याला उष्णतेची भीति नाही, कारण तो अत्यंत उष्ण प्रदेशात कृत्रिम मार्गानी थंड वातावरण निर्माण करू शकतो.

बाह्य परिस्थितीपासून शरीराच संरक्षण करण्याला अनुकूल असाच प्राण्याचा विकास होतो. शीतकटिबंधात राहणाऱ्या प्राण्याच्या अंगावर थंडीपासून संरक्षण करण्याकरिता केसाळ कातडी असते उष्ण कटिबंधातील वाघ, सिंह ही जनावरं केसाच्या कातडीची मुळीच नसतात. साप, विंचू इत्यादि प्राण्याची पैदास उष्ण कटिबंधात पुष्कळ असते, पण शीत कटिबंधात हे प्राणी फार कमी आढळतात. परिस्थितीमुळ प्राण्याच्या शरीरात जो बदल होतो तो सुखासुखी होत नाही. अशा प्रकारच्या स्थित्यंतरात शरीराला थोडेफार कष्ट सहन करावे लागतात. बुद्धीच्या अभावी पशू ते सहन करतात व मनुष्य करीत नाही

थंडीवाऱ्यापासून आपल संरक्षणच करावयाच नाही, असा हट-वादच जर मनुष्यान धरला, तर शरीराला पोषक असा योग्य तो

फरक त्याच्या चामडीत होतो, हे सहज समजण्यासारख आहे. थडीवारा, ऊनपाऊस यापासून शरीराच सरक्षणच करावयाच नाही असा हट्ट धरून नग्नव्रत धारण करणारे दिगंबर तपस्वी आपल्या देशातील पुण्यक्षेत्रामधून पुष्कळ आढळतात. त्याच्या अशा तपश्चर्येमुळ त्याना ब्रह्मपदाची प्राप्ति होत असेल किवा नसेल, पण त्याच्या शरीराकड पाहून, कपड्याचा किवा वल्कलाचा उपयोग मनुष्याला सुचण्यापूर्वी त्याची कातडी कशी असेल याची थोडीबहुत कल्पना अवश्य येते. दक्षिण हिंदुस्थानासारख्या उष्ण प्रदेशात नाममात्र थडी असताना, हिवाळ्याच्या दिवसात, बनियन, फ्लॅनेलचा शर्ट, स्वेटर, लोकरी कोट, मफलर, ओव्हरकोट व माकडटोपी इत्यादि लोकरी कपड्यानी जे शरीराचा कोडमारा करतात व थोडीशी छाती उघडी पडल्याबरोबर ज्याना निमोनिया होण्याची भीति असते, त्यानी, गगोत्रीसारख्या, समुद्रसपाटीपासून नऊ हजार फूट उच्च असलेल्या व हिमालयाच्या हृदयात वसलेल्या हिममय प्रदेशात नग्न राहाण म्हणजे काय, याची कल्पना करावी! कपड्याचा उपयोग करून थडीवाऱ्याच्या बाबतीत मनुष्य अत्यंत ससर्गक्षम बनला आहे हे खचित. सबध मानवजातीन जर एक दम वस्त्रावर बहिष्कार टाकला तर निमोनियापासून होणाऱ्या मृत्यूची संख्या शभर पटीन अधिक वाढेल असा तज्ञाचा अदमास आहे

जेव्हापासून मनुष्याला बुद्धीची देणगी मिळाली व तिचा विकास होऊ लागला, तेव्हापासून त्याचा शारीरिक विकास थाबला विज्ञानाच्या प्रगतिमुळ निसर्गावरच त्याच प्रभुत्व जस वाढेल तसा त्याच्या शारीरिक विकासाचा संभव कमी होत जाईल.

मनुष्यान मिळविलेला निसर्गावरचा पहिला महत्वाचा विजय म्हणजे कृत्रिम तऱ्हेन अन्न उत्पादन करण्याची कला—शेती. शेतीमुळ मनुष्याला स्थैर्य व शाति लाभली. त्याच्यामागे लागलेली जीवनाविषयीची विवचना नष्ट झाली. पण यामुळ समाजरचनेत

अत्यंत महत्वाचा फारक घडून आला. विस्कळित स्वेच्छाचारी वृत्तीचा मानव, ज्याच्या तत्कालीन समुदायाला समाज हे नाव देणे अन्यायाच होईल, सुसघटित समाजजीवनाची अपेक्षा करू लागला. सहकारितेचा उगम झाला. शेतीला योग्य अशा जमीनीमधून वसाहतीस आरंभ झाला संपत्तीच्या उत्पादनाचे सुगम साधन सामान्यतः जमीनच असल्यामुळ, जितकी जमीन अधिक तितकीच्च सुखमय जीवन व्यतीत करण्याची साध अधिक, अशी परिस्थिति उत्पन्न झाली. ज्यानी जमीनीची मालकी संपादन केली त स्वतंत्र झाले व बाकीचे परतंत्र झाले. या परतंत्र लोकाना जमीनींच्या मालकाच्या हिताकरिता राबाव लागे. एव्हापासून जगदारंभीच्या साम्यवादाचा अत झाला व इंग्रजीत ज्याला 'स्लव्ह स्टेट' म्हणतात, त्या गुलाम–शासनव्यवस्थेचा जन्म झाला.

कदमुळ मास व फळ भक्षण करून स्वेच्छेन विहार करण्याचा स्वामिसेवकभावविरहित असा जगदारंभीचा साम्यवादाचा काल. संपत्तीच्या उत्पादनपद्धतीत जेव्हा क्रांति झाली तेव्हा समाजव्यवस्थेतहि क्रांति झाली. समाजाची उत्पत्ति झाली. निसर्गनिर्मित अन्नावर अवलबून राहण्याचा काल संपला. शेतीच्या शोधाबरोबरच सेव्यसेवकभावप्रधान अशा गुलाम-राज्यव्यवस्थेचा उदय झाला. समाजाची अर्थोत्पादनपद्धति व समाजाची रचना याचा निकट सबंध यावरून ध्यानात येण्यासारखा आहे

ही इतिहासातील पहिली क्रांति. हा मानवसमाजाच्या विकासातील पहिला 'डायलेक्टिकल चेंज' मानवसमूहाच्या रचनेत या वेळी आमूलाग्र क्रांति झाली जगदारंभीचा साम्यवाद जाऊन त्याच्या जागी गुलामराज्यवस्थेचा आदेश झाला.

---

# गुलामशाही : : ४

## स्लेव्ह स्टेट

गुलामशाहीत अर्थोत्पादनाची साधन—ज्यात प्रामुख्यान 'जमिनीचा अतर्भाव होतो—काही थोड्या लोकाच्या हातात असत व अर्थोत्पादनाच्या कार्यात बहुसंख्य लोक गुलाम म्हणून राबत व मिळेल तो मोबदला घेत हे परावलंबित्व असंख्य लोकानी पत्करल. कारण रानटी अवस्थेपेक्षा या नूतन अवस्थेत सुखाचा अधिक संभव दिसू लागला जगदारंभीची साम्यवादाची अवस्था सोडून या गुलामशाहीपुढ नमत घेण्याचा मूर्खपणा लोकानी कसा केला या प्रश्नाला अवकाशच नाही. कारण गुलाम राज्यव्यवस्थेमुळ जे पारतन्त्र्य आल, त्याचा मोबदला शेतीच्या शोधामुळ आर्थिक स्थैर्याच्या रूपान मिळाला. म्हणूनच लोकानी या पारतन्त्र्याच्या जूखाली आपली मान अडकविली

प्राचीन काळी ग्रीकाची लोकसत्ताक नगरराज्य होती. ही लोकसत्ता केवळ वरिष्ठ वर्गाकरिताच मर्यादित होती. आजकाल प्रचलित असलेल्या नावाच्या लोकसत्तेप्रमाण ती श्रीमतांचीच लोकसत्ता होती. लढायातून पकडून आणलेल्या गुलामाची संख्या पुष्कळ असे. या गुलामाना, गरीब लोकाना व स्त्रियाना शासनयन्त्राच्या बाहेरच ठेवले जात असे.

याच काळी ग्रीसमध्ये अनेक विद्वान लोक उदयास आले. या लोकानी जगाच्या इतिहासात ग्रीसच नाव अजरामर करून सोडल आहे. ग्रीसन निर्माण केलेल्या या विद्वानाच्या मालिकेवरून दृष्टि फिरविली म्हणजे ग्रीसन जगाला किती ऋणी करून ठेवल आहे याची कल्पना येते फीडियस व त्याच्यासारखे पुष्कळ सुदर शिल्पकार त्या काळी होऊन गेले. त्याच्या कलाकृतीच आजतागायत जगाला कौतुक वाटत याच काळात सोफोक्लीज. एश्चिलीज. युरिपिडीज्, ॲरिस्टोफेन्स, पिडार, मीनाडर इत्यादि कविश्रेष्ठाना व नाटककाराना ग्रीसन जन्म दिला. या स्त्रियाच्या गुलामगिरीच्या काळात सॅफो नावाची एक कवयित्री देखील उदयास आली. पेरिक्लीज नावाच्या मुत्सद्यान तीस वर्षेपर्यंत अव्याहत अथेन्सवर सत्ता गाजविली व याच्याच कारकीर्दीत अथेन्स शहर भरभराटीला आल याच्याच कारकीर्दीत कलेला उत्तेजन मिळाल व अथेन्स शहर सुदर इमारतीनी गजबजल फीडियस नावाचा प्रसिद्ध शिल्पकार याच्याच पदरी होता, म्हणूनच अथेन्सला पेरिक्लीज्च अथेन्स अस म्हणण्याचा आजपर्यंत प्रघात आहे. ज्याच्या इतिहासान आपल्याला तत्कालीन परिस्थितीच ज्ञान होत, ते प्रसिद्ध इतिहासकार हेरोडोटस् व थुसिडाइडीज् याच वेळेस होते सत्य सोडण्यापेक्षा विषाचा प्याला पिऊन मरण ज्याला श्रेयस्कर वाटल तो सॉक्रेटिस, त्याचा तत्त्ववेत्ता शिष्य प्लेटो व आधुनिक भौतिकशास्त्राचा प्रवर्तक, प्लेटोचा शिष्य व अलेक्झाडरचा गुरु ॲरिस्टॉटल हे सर्व याच कालखडात अवतीर्ण झाले.

अथेन्समधील पुरातन कलाकृतीचे अवशेष पाहून आपण आश्चर्यान थक्क होतो, पण ज्याच्या अविश्रात शारीरिक श्रमान ग्रीस देशाला उन्नतावस्था प्राप्त झाली, अथेन्स सुदर इमारतीनी गजबजल व सडका, तलाव व कालवे याची रेलचेल झाली, ते लोक गुलाम होते. दलित होते, हे आपण विसरतो. गुलामवर्गाच्या अंगमेनहतीमुळ सुशिक्षित वर्गाला आर्थिक स्थैर्य लाभल व

कलेच्या निर्मितीला योग्य असं वातावरण निर्माण होऊ शकेल.

* * * *

आर्यांनी जेव्हा हिंदुस्थानात वसाहतीस आरंभ केला, तेव्हा त्यांना मूळच्या द्रवीड रहिवाशांशी लढाया कराव्या लागल्या. द्रविड लोकांना जिंकून आर्यांनी त्यांना गुलाम बनविलं. नंतर ग्रामपंचायती निर्माण झाल्या व लहान लहान राज्यं उदयाला आली. वर्णव्यवस्था निर्माण झाली.

वर्ण या शब्दाचा अर्थ रंग असा होतो. वर्णव्यवस्था या समासातील वर्ण हा शब्द जातिवाचक असला, तरी रंगवाचक वर्णापासूनच त्याचा नवीन उपयोग आर्यांना सुचला असावा. आर्यलोक वर्णानं गोरे होते, द्रविड लोक काळे होते. वर्णव्यवस्थेत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे श्रमविभागाच्या दृष्टीनं उच्च असलेले वर्ण आर्यांनी स्वतःकरिता राखून ठेवले व पराजित काळ्या लोकांना सेवाधर्म सांगितला.

आर्यांनी केलेल्या शूद्रविषयक अन्यायाची कितीतरी उदाहरणं इतिहासपुराणांतून तर देता येतीलच, पण शूद्रावरचा गुलामीचा डाग आपण आजपर्यंत धुऊन टाकू शकलो नाही हे आपल्या हीन मनोवृत्तीचं द्योतक आहे. स्त्रियाविषयी देखील आर्यांची दृष्टि उदार नव्हती. शास्त्राप्रमाणं वेदपठणाचा अधिकार स्त्रियांना नाही. 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' या मनूच्या उद्गारावरून आर्यांच्या स्त्रीस्वातंत्र्यविषयक कल्पनांवर प्रकाश पडतो. वारसाहक्काच्या बाबतीत स्त्रियांची उपेक्षा झालेली आहे. सूतासारख्या विद्वानाला देखील वेदपठणाचा अधिकार मिळाला नाही; कारण तो शूद्र होता. एकलव्य शूद्र होता, म्हणूनच त्याला धनुर्विद्या शिकवावयाचं द्रोणाचार्यांनी नाकारलं. या प्राचीन गुलामगिरीचे अवशेष कोणत्यांना कोणत्या तरी रूपानं शिल्लक आहेतच.

आपणच आपल्या बांधवांना इतक्या नीचतेनं वागवितो व वागवीत आलो तर युरोपियन लोक आपल्याला काळे म्हणून कमी

लेखतात यात आश्चर्य ते काय !

लंडनला होणाऱ्या एका जागतिक पिंगपॉग टूर्नामेंटची वर्तमानपत्रात जाहिरात आली होती. त्या टूर्नामेंटमध्ये एका हिंदी तरुणाने नाव दिले. तो जेव्हा योग्य समयी लंडनला गेला, तेव्हा त्याच्या भोजननिवासाची सोय करणे टूर्नामेंट कमिटीला भाग होते. कमिटीचे व्यवस्थापक लंडनभर फिरले. पण एकहि गोरा हॉटेलवाला या काळ्या माणसास आश्रय द्यावयास तयार झाला नाही ! सर हरिसिंग गौर प्रभृति सुविद्य व सधन व्यक्तींचा लंडनच्या हॉटेलवाल्यानी केलेला अपमान, नुकताच प्रसिद्धीला आलेले मध्यप्रांताचे त्रिवेदी-प्रकरण इत्यादि अनेक गोष्टी काळे–गोरे या भेदनीतीच्या द्योतक आहेत.

ग्रीसप्रमाणे हिंदुस्थानातही मोठमोठे कलावंत व विद्वान जन्माला आले. ग्रीसचा हेवा वाटण्याचे आपल्याला मुळीच कारण नाही. ग्रीसपेक्षाहि श्रेष्ठ अशा सुधारणेस भारतीय आर्यांनी जन्म दिला. चार वेदांची उत्पत्ति झाली.

अग्रतश्चतुरो वेदान् पृष्ठतः सशरं धनुः ।
इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि ॥

अशा प्रकारच्या जाज्वल्य वीरश्रीला आर्यांनी जन्म दिला ! उपनिषदांची उत्पत्ति झाली, वाल्मीकि व व्यास यानी सर्वश्रेष्ठ व पुरातनतम रामायण व महाभारत ही महाकाव्ये रचली. दर्शनकार कणाद, कपिल, जैमिनी, पतंजलि व व्यास यानी त्रिकालाबाधित अशा सत्य सिद्धांताचे प्रतिपादन करून, जगातील अंतिम सत्य ओळखण्याकरिता विद्वान लोकामध्ये अहोरात्र जी धडपड चालली आहे, जी शर्यत लागली आहे, ती शर्यत हजारो वर्षांपूर्वीच जिंकली ! शब्दब्रह्माचे व्युत्पादन करून संस्कृत भाषेला विकासाच्या उच्चत्तम शिखरावर पोहचविणारे व्याकरणकार, पाणिनि, पतंजलि व कात्यायन हे त्याच कालात उत्पन्न झाले. प्रत्यक्ष मृत्यूच्याहि जबड्यातून मनुष्याला ओढून आणणारे पतंजलि व

धन्वंतरि हे वैद्य याच कालातले होते.

जगातील सर्वश्रेष्ठ म्हणून नावाजलेल्या शाकुंतल नाटकाचा जनक कालिदास याच कालात आपली कलाकृति निर्माण करीत होता. माघ, दंडी, भारवि, श्रीहर्ष, भवभूति, जय्यट, उव्वट कय्यट, मम्मट इत्यादि बंधू, या व अशाच अनेक आर्यबुद्धि वैभवद्योतक तारका, जेथे संशोधनाच्या ज्योतीचा प्रकाश मंद होतो अशा एका दूरच्या कालखंडाला प्रकाशित करीत आहेत सारनाथ व महंजोदारो येथील पुरातन अवशेष, अजिंटा वेरूळ, भाजे, कार्ले येथील कोरीव लेणी आर्यांनी केलेल्या शिल्पकलतील प्रगतीची द्योतक आहेत व जगातील आश्चर्यांत त्याना स्थान मिळाल आहे. नेपथ्य, रत्नपरीक्षा, आकरज्ञान ज्योतिष, चित्र-कला, पाकशास्त्र, गायन, नृत्य, नाट्य, इत्यादि विविध विषया-वरील उपलब्ध व अनुपलब्ध ग्रंथभांडार पाहून, बाणाच्या कादंब-रीतील उपमाचं बाहुल्य व विविधता पाहून ज्याप्रमाणं कोणी रसिकान ‘ बाणोच्छिष्ट जगत्सर्वम ’ अस उद्गार काढले, त्याच-प्रमाण आर्योच्छिष्ट जगत्सर्वम ’ अस म्हणावस वाटत

रोम आणि ग्रीसमध्ये शासित व शासक गुलाम व मालक याचा भेद जितका तीव्र व वर्गयुद्धजनक होता, तितका तो हिंदु-स्थानात राहिला नाही. आर्यांनी जेव्हा हिंदुस्थान जिंकल तेव्हा आधुनिक गोऱ्या लोकाप्रमाण कलरबार निर्माण केला नाही आपली हिंदभू बंकीमचंद्रानी वर्णिल्याप्रमाण ‘सुजला सुफला सस्यश्यामला’ अशी असल्यामुळ मालकाना आणि गुलामाना, जितजेत्याना उप भोगून उरण्यासारखी समृद्धि त्या कालात होती. जरी वर्णव्यवस्थेत अनार्याला नीच स्थान होत आणि जरी उदरनिर्वाहाकरिता त्याला आर्यांचा दास होऊन राहाव लागे, तरी उदरभरणाच्या व वस्त्रप्राव-रणाच्या बाबतीत तो अत्यंत सुखी होता अस दिसत.

मनुष्याला बुद्धीची अपूर्व देणगी मिळालेली आहे. या देणगी-मुळ मनुष्य आपसात न झगडता, रक्तपात न करता, विकासमार्गा-

वरील आपला प्रवास सुखकर करू शकतो, याच प्राचीन हिंदुस्थान हे अप्रतिम उदाहरण आहे. हा विकासमार्गाचा आपला प्रवास इतका कल्पनेच्या बाहेर सुखकर झाला की, विकास आणि क्रांति या काही वस्तु आहेत हे आपण विसरून गेलो इतकच नव्हे तर क्रातीच्या ऐवजी शांतीन आपला विकास करून घेण्यात आपल्या पूर्वजाच्या दूरदर्शित्वामुळ आपल्याला जे यश आल, त्या यशाच्या उन्मादाच्या भरात विकासवादाचे जे स्थलकालाबाधित नियम ते हिंदुस्थानाला लागू नाहीत असहि आपण प्रतिपादू लागलो ज्या कारणामुळ आपण गुलामशाहीची दशा शातीन अतिक्रात करून मरजामशाहीत येऊन पोहचलो त्याच कारणामुळ व तितक्याच शातीन विकासपथावरील आपला पुढील प्रवास सुखकर होवो व आपल्या भावी पिढ्या 'विकासवाद हिंदुस्थानाला लागू नाही या गोड असत्याचच प्रतिपादन करोत

आपल्या देशात पूर्वीच्या काळी प्रचड गुरुकुल असत. या गुरुकुलामधून शूद्राशिवाय इतर लोकाना शिक्षण मिळत असे. पुष्कळ ठिकाणी शूद्रानी देखील शिक्षण घेतल्याचे दाखले आहेत ज्याप्रमाण लष्करी शिक्षण हे शासक-वर्गालाच मिळाव अशी स्वार्थी व्यवस्था शासकवर्ग करतो, त्याप्रमाण धनुर्विद्या ही शासक आर्य लोकाकरिताच मर्यादित रहावी असा आर्यांचा कदाचित् हेतु असावा, अस एकलव्याच्या व कर्णाच्या उदाहरणावरून अनुमित करण्यास जागा आहे. वेदातिरिक्त ग्रथाच्या अध्ययनाची शूद्राना देखील परवानगी होती अस सूताच्या उदाहरणावरून दिसत.

या गुरुकुलाचे कुलपति वसिष्ठ भारद्वाज, याज्ञवल्क्य, सादीपानि, इत्यादि विद्वान् ऋषिमुनी असत. समाजाच्या धारणपोषणाकरिता नियम करण, ऐहिक आणि पारलौकिक सुखाचे मार्ग शोधून काढण, समाजोन्नतीला आवश्यक असलेल्या सर्व शास्त्रामध्ये राष्ट्राच्या भावी प्रजेला निष्णात करण, इत्यादि कार्य ते करीत. कित्येक तपस्वी आत्मचिंतनार्थ रानात जीवन व्यतीत करीत. या लोकांच्या

आज्ञा राजे लोक वेदप्रमाण मानीत. राजे म्हणजे ऋषिलोकांनी ठरविलेल्या तंत्राप्रमाणे राज्ययंत्र चालविणारे प्रजेचे सेवक होते. 'प्रजानां रंजानाद्राजा' अशी राजा या शब्दाची व्युत्पत्ति आहे. जो प्रजेचे रंजन म्हणजे पालनपोषण करतो तो राजा. केवळ लोकप्रवादाच्या ऐकण्यावरून, लोकांचे वर्तन बिघडू नये म्हणून, अग्नीने शुद्ध ठरविलेल्यासुद्धा जानकीला रामचंद्राने त्यागले. लोकहिताविषयी केवढी ही दक्षता! निरनिराळ्या प्रकारच्या यज्ञांच्या द्वारे गोरगरीबांना व ब्राम्हणांना विपुल द्रव्यसाहाय्य मिळत असे. कर्ण, हरिश्चंद्र, बलि व श्रियाळ इत्यादि दानशूरांच्या दातृत्वाविषयीच्या नवलकथा आबालवृद्धांच्या माहितीच्या आहेत. पौराणिक कालातील गोष्टी जरी अनैतिहासिक म्हणून सोडल्या, तरी ऐतिहासिक कालांतसुद्धा अशी उदाहरणे कमी नाहीत. राजा श्रीहर्ष आपला खजिना चार वर्षांला एकदा गरीब लोकांकडून लुटवीत असे, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. चंद्रगुप्ताच्या दरबारचा ग्रीक वकील मेगॅस्थिनीस याचे लेख व कौटिल्य ऊर्फ चाणक्य याचे अर्थशास्त्र यावरून चंद्रगुप्ताची प्रजा किती सुखी होती याची कल्पना होते. सबंध प्रजेला शोकरहित बनवून ज्याने आपले अशोक हे नाव सार्थ केले, त्याच्या वेळची माहिती उपलब्ध असलेल्या बऱ्याच शिलालेखांवरून मिळते. त्याच्या शासनकाली हिंदुस्थान उन्नतीच्या शिखरावर आरूढ झाला होता. अशोकाविषयी एच्. जी. वेल्सने काढलेले उद्गार पाहिले म्हणजे प्रत्येक भारतीयाच्या हृदयात आनंदोर्मी उसळल्यावाचून राहणार नाहीत. तो म्हणतो, 'हजारो दिग्विजयी राजे, पराक्रमी महाराजे व सार्वभौम सम्राट इत्यादींनी इतिहासाच्या पानांवर जी केवळ गर्दी मांडली आहे, त्या गर्दीतून, अंधाऱ्या रात्री चकाकणाऱ्या एकच एक ठळक ताऱ्याप्रमाणे, अशोकाचे नाव ह्ट्टाने आपले अस्तित्व जाणवीत आहे. व्होल्गापासून जपानपर्यंत अजून त्याची कीर्ति हयात आहे. अशोकाची धार्मिक तत्वे जरी हिंदुस्थानाने त्यागली असली, तरी हिंदुस्थान,

चीन व तिबेट अजून अशोकाच्या थोरपणाची साक्ष देतात. कॉन्स्टंटाईन व चार्लमेन या प्रसिद्ध गणल्या जाणाऱ्या बादशहाची नाव जितक्या लोकानी नुसती ऐकली असतील, त्याहून अधिक लोक अशोकाच्या पुण्यमय कीर्तीचे साक्षीदार म्हणून भूतलावर हयात आहेत.'

'अप्रतिम सेनाबल व विश्वविजयी सामर्थ्य असताना विजय-यात्रेच्या मोहावर विजय मिळविणारा असा एकमेव शूर राजा इतिहासाला ज्ञात आहे ' हे एच. जी. वेल्सचे अशोकाविषयीचे उद्गार आहेत. अशोकाच्या कारकीर्दीनंतर सहाशे वर्षांनी फा-हैन नावाचा चिनी प्रवासी अशोकाची राजधानी पाटलीपुत्र येथे गेला. अशोकाच्या दगडी राजवाड्याचे अवशेष पाहून ते अतिमानुष, दैवी कलाकृतीचे चमत्कार आहेत, अस त्यान नमूद करून ठेवल आहे.

असे प्रजाहितदक्ष व धर्मान चालणारे राजे होते, म्हणून प्रजा सुखान नादत होती. प्रजेच्या सुखाचे व प्रगतीचे मार्ग दूरदर्शी चतुर राजे स्वतःच खुले करून देत. प्रजेच्या विकासाचे मार्ग खुले राहिले म्हणजे विकासाच्या सर्व श्रेणीमधून ती सुखान जाते. हा मार्ग बद असला म्हणजेच क्रातीचा प्रश्न उद्भवतो.

शासक लोक समजस व दूरदर्शी असले म्हणजे क्राति या शब्दोच्चारमात्रान जी, रक्तपात, मनुष्यहानि व द्रव्यनाश अभिप्रेत आहेत, ती सर्व कशी टाळता येतात याच भारतवर्ष हे अप्रतिम उदाहरण आहे.

* * * *

युरोपातील देशात गुलामाची बड झाली. आपल्या मालकाच्या विरुद्ध बंड पुकारून गुलामानी व गरीब लोकानी स्वातत्र्य कमावल गुलामानी केलेल्या बेगारीच्या मेहनतीन जमिनीची पैदास अत्यत कमी होऊन वाढत्या लोकसंख्येची अन्नाची मागणी पूर्ण होईना, म्हणून गुलामशाहीचा अंत झाला व तिच्या जागी सरंजामशाही

अधिष्ठित झाली.

हिंदुस्थानात अशा बंडाना अवकाश नव्हता, हे सहज समजण्यासारखे आहे. शूद्रलोकाचे पुष्कळसे पारतन्त्र्य आर्यांनी आपण होऊनच नष्ट केले. बहुजनसमाजाचा असंतोष सहनशीलतेची सीमा उल्लघू लागला म्हणजे क्रांतीला कारण होतो. अशी परिस्थिति भारतीय शासकानी उत्पन्नच होऊ दिली नाही.

कृषीच्या शोधामुळे मनुष्याच्या स्वेच्छाचाराला पायबंद बसून गुलामशाहीचा उदय झाला, ही पहिली क्रांति.

जुलुमान्या धास्तीने वेगारीवर खपणाऱ्या गुलामाकडून वाढत्या लोकसंख्येकरिता अन्नोत्पादन करविणे अशक्य होऊ लागले म्हणून गुलामाची बंड झाली व सरंजामशाहीचा उदय झाला, ही दुसरी क्रांति

---

# सरंजामशाही : : ५

मनुष्याच्या शारीरिक गुलामगिरीचा नाश हाच सरजामशाहीचा उदय होय. स्वत.च्या शरीरावरील मनुष्याची मालकी कायद्याच्या दृष्टीन एव्हापासून प्रस्थापित झाली. त्याच्या शरीरावरील दुसऱ्याचा हक्क ' कायद्यात ' नाहीसा झाला. शरीराला दुसऱ्याकरिता राबवण जरी त्याला भाग होत, तरी ते कोणाकरिता राबवाव याविषयी विचार करण्याच स्वातत्र्य त्याला मिळाल. उपाशी मरण्याच देखील स्वातत्र्य ज्या समाजात नसे, त्या समाजापेक्षा उपाशी मरण्याचच का होईना स्वातत्र्य जेथे आहे ती समाजव्यवस्था श्रेष्ठ, हे निर्विवाद आहे.

मध्य सरजामशाहीत सपत्तीच्या उत्पादनाच व बहुजनसमाजाच्या उदरनिर्वाहाच साधन जमीनच होती. समाज कृषिप्रधान होता. यत्रयुगाच्या उदयापर्यंत सर्व पृथ्वीवर सरजामशाही अधिष्ठित होती. यंत्राच्या शोधानी सपत्तीच्या उत्पादनपद्धतीत क्रांति घडवून आणली. उत्पादनपद्धतीतिल क्रातीमुळ समाजातील नूतन घटकाना महत्व प्राप्त झाल. हे महत्व टिकविण्यासाठी व वाढविण्यासाठीं पूर्वीच्या सत्ताधीशाना पदच्युत करून नवीन लोकाना सत्ता हातात घेण भाग होत. जीर्ण समाजव्यवस्थेतील सत्ताधाऱ्याचा अधिकारसंन्यास व उदयोन्मुख समाजव्यवस्थेतील प्रगतिपर पुढाऱ्याच

अधिकारग्रहण, क्वचितच सामोपचारान इतिहासात घडून आली आहेत. सरजामशाहीच्या उच्चाटनाकरिता प्रत्येक देशात क्रांत्या झाल्या. इग्लंडातील ' इंडस्ट्रियल रेव्होल्यूशन ', १७८९ मधील फ्रेंच क्रांति, १८४८ च्या आसपास झालेल्या युरोपमधील निर निराळ्या क्रांत्या व रशियातील मार्च १९१७ तील क्रांति, या सर्व सरजामशाहीच्या उच्चाटनार्थ झालेल्या क्रांत्या होत.

फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळची फ्रान्सची स्थिति फार हलाखीची होती. सप्तवार्षिक युद्धामुळ व अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धामुळ फ्रेंच सरकारला भयकर कर्ज झाल होत. जमीनदार, धर्माधिकारी व सरकारी कर्मचारी याना कर माफ असल्यामुळ सरकारचा रिकामा खजिना भरण्याच एकमेव साधन गोरगरीबाची पिळणूक हेच होत. लोकाची अन्नान्नदशा झाली व लक्षावधी लोकाच्या भुकेकगाल टोळ्या लुटारूंचा व भिकाऱ्याचा धंदा करू लागल्या. सरकारी रिपोर्टानुसार १८७७ मध्य अकरा लक्ष भिकारी फ्रान्समध्ये होते अस म्हणतात.

हा गोंधळ पाहून, लहरी राजाच्या स्वैरसत्तेला व पाद्री आणि जमीनदार याच्या जुलमाला पायबद घालण्यासाठी, ' बहुजनसंमती-शिवाय कसल्याहि प्रकारचे कर लोकावर लादण्यात येऊ नयेत. ' अशा आशयाची बहुजनसमाज मागणी करू लागला. स्वतःच्या अधिकारक्षेत्रात जनतेन केलेला हा हस्तक्षेप सहन न होऊन तेव्हाचा राजा सोळावा लुई यान आपल्या सैन्याला प्रजेविरुद्ध युद्ध पुकारण्याचा हुकुम दिला. सैन्यान सविनय आज्ञाभग करताच लुईन परदेशी सैन्याच्या मदतीन लोकावर अत्याचार आरंभिले. या अकारण अत्याचाराविरुद्ध प्रजेन बंड पुकारल व इतिहासप्रसिद्ध फ्रेंच क्रांतीन अशा प्रकारे स्फोट घेतला.

सोळावा लुई व त्याची पत्नी मेरी याना जाहीररीत्या गिलोटीन करण्यात आल, फाशी देण्यात आल.

महायुद्धानंतर लोकशाही रशियाला नष्ट करण्याकरिता भाडवल-

शाही राष्ट्रानी ज्याप्रमाण मोहीम चालविली, किंवा गुलामगिरीच्या नाशाला उद्युक्त झालेल्या लिंकनविरुद्ध दक्षिणेकडील संस्थानातील नीग्रो मालकानी ज्याप्रमाण युद्ध पुकारल, त्याचप्रमाण फ्रेंच भांडवल-शाहीच्या उन्मूलनार्थ सरजामशाही व राजसत्ताक युरोप संघटित झाल. यंत्रप्रधान समाजाच्या उच्चाटनार्थ शेतकीप्रधान समाज संघटित झाला भांडवलशाहीच्या नाशार्थ सरजामशाही प्रयत्न करू लागली.

फ्रेंच क्रातीन नेपोलियनला जन्म दिला, रशियन क्रांतीन लेनिन व ट्रॉट्स्की याना पुढे आणल व चिनी क्रातीन माव् त्से-तुग -च टे, व चँग कै शेक याना इतिहासात अमर केल.

नेपोलियन फ्रेंच क्रातीचा जनक नसून, फ्रेंच क्राति ही नेपोलियनची जननी आहे. लेनिन आणि ट्रॉट्स्की यानी रशियन क्राति घडवून आणली नसून क्रातीन लेनिन व ट्रॉट्स्की याना घडविल आहे. कित्येक नेपोलियन, ट्रॉट्स्की व लेनिन क्रातीच्या होमकुंडात स्वाहा झाले व इतिहासाला ज्ञात असलेलेहि नेपोलियन, ट्राट्स्की व लेनिन स्वाहा झाले असते तर त्या वीरप्रसू क्रातीन सवाई नेपोलियन-लेनिन-ट्रॉट्स्की याना जन्म दिला असता! म्हणूनच 'मॉडर्न रेव्हय़ु' न भारतीयाना सुपरिचित करून दिलेला पातालवासी पाद्री ग्रथकार जे. टी सडरलड म्हणतो, 'महात्मा गाधीच्या आत्यंतिक सौम्य विनवणीचा अव्हेर करून जर ब्रिटिश लोक भरत-भूमीला स्वातत्र्य द्यावयाच नाकारतील व हिंसामार्गाच अवलंबन करण्यास भारतयिाना भाग पाडतील तर वॉशिग्टन, ग्रीन अलेन, आणि पुटनम् सदृश सेनानायकाना निर्माण करण भरतभूमीला भाग पडेल अमेरिकन स्वातत्र्ययुद्धाप्रमाण जरी सप्तवार्षिक दीर्घ कालावधि लागला, तरी भारतीय योद्धे स्वातत्र्यमदिर गाठतील. क्रातीच पाऊल पाठीमाग कधीहि पडू शकत नाही.' या उद्गारा-वरून क्रांतीच वीरजननीत्व व पुरोगामित्व सिद्ध होत. असो.

प्रगमनशील जगात हलगर्जीपणान यांत्रिक सुधारणेच्या शर्यतीत

पाठीमागे राहिल्याचे प्रायश्चित्त पौर्वात्य राष्ट्रांना पाश्चिमात्य राष्ट्रांच्या गुलामीच्या रूपाने करावे लागत आहे. यांत्रिक सुधारणेचे महत्त्व जपानने वेळीच जाणले, व सुधारणेच्या पाश्चात्य पाढऱ्या कोडाचा आपल्या पिवळ्या शरीराला डाग लागू न देता आपली प्रगति करून घेतली, व सुधारणा ही जर पाश्चात्य असू शकते तर ती पौर्वात्यहि असू शकते असे सिद्ध करून सुधारणेचे सार्वदेशिकत्व सर्वांच्या निदर्शनास आणले.

हिंदुस्थानातील सरंजामशाहीच्या उच्चाटनाचे काम ब्रिटिशांच्या आगमनाने केले. ब्रिटिशांच्या अगोदर हिंदुस्थानात पोर्तुगीज आले, फ्रेंच आले व हिंदुस्थानच्या तत्कालीन अयांत्रिक परिस्थितीत जे ब्रिटिशांनी केले तेच इतर कोणीहि केले असते. यांत्रिक प्रगतीमुळे होणाऱ्या हस्तव्यवसायाच्या नाशाचे खापर पॅरिस किंवा लिस्बनवर फुटावयाचे ते मँचेस्टरवर फुटले. यांत्रिक युगाच्या प्रगतीकरिता हस्तव्यवसायाचा नाश होणे आवश्यक होते. ज्या डाक्याच्या विणकऱ्यांनी विणलेले लुगडे एका आंब्याच्या कोयीत बंद करून पाठविता येत असे व ज्या डाक्याची सात लुगडी नेसून, जणू वस्त्रहरणासाठीच सजून, कोण्या एका मोगल बादशहाची लावण्यवती पुत्री दरबारात आली असता ती विवस्त्र आल्याचा भ्रम बादशहाला झाला, त्या डाक्यातील कलावंतांची यंत्रामुळे अन्नान्नदशा झाली. १८२४ साली डाक्याची लोकसंख्या दीड लक्षावर होती, १८३७ साली ती वीस हजार झाली !

आपला व्यापार वाढविण्यासाठी ईस्ट इंडिया कंपनीने जे पराकाष्ठेच्या नीचतेचे उपाय योजले, त्याचे सूचिपत्र म्हणजे वॉरन हेस्टिंग्जची कारकीर्द. कच्चया मालाच्या पुरवठ्यासाठी व तयार मालाच्या विक्रीसाठी हिंदुस्थानाला ब्रिटिशांच्या अधीन करून ठेवणे हेच आजपर्यंत ब्रिटिश शासकांचे धोरण राहिले आहे.

मराठ्यांचा इंग्लिशांनी पराभव केला, 'मराठे हे मुत्सद्दी किंवा लढवय्ये नव्हते म्हणून नव्हे, तर इंग्लिशांच्या तोफांपुढे मराठ्यांना

हात टेकावे लागले म्हणून. सुधारणेत मागे पडलेल्या राष्ट्रांना सुधारलेल्या राष्ट्रांनी जिंकावं हा इतिहासाचा सर्वसामान्य नियम आहे. भौतिक विज्ञानजन्य प्रगतीचा इतिहासावर कसा परिणाम होतो, हा अत्यंत मनोरंजक विषय आहे. सायमन स्टेविन नावाच्या एका प्रतिभावान् एंजिनियरच्या डोक्यातून उत्पन्न झालेल्या, समुद्राच्या पुरात वाहतुकीच्या आसपासचा प्रदेश बुडवून टाकण्याच्या अभिनव कल्पनेमुळं सोळाव्या शतकात हॉलंडनं स्पेनाविरुद्ध पुकारलेलं स्वातंत्र्ययुद्ध यशस्वी झालं. लॅझेर कार्नोट नावाच्या फ्रेंच शास्त्रज्ञानं फ्रेंच क्रांतीच्या वेळी क्रांतिकारक सैन्याला मुबलक दारूगोळा पुरवून क्रांति यशस्वी करून दाखविली. महायुद्धात जेव्हा ब्रिटिशांना ॲसिटोनचा तुटवडा पडला, तेव्हा डॉ. वीझमन या ज्यू रसायनशास्त्रज्ञानं कृत्रिम तऱ्हेनं ताबडतोब ॲसिटोन तयार करून इंग्लंडचा बचाव केला. त्याच महायुद्धात डॉ. फ्रेड्रिक हाबेल या नोबेलपारितोषकप्राप्त जर्मन ज्यू रसायनशास्त्रज्ञानं हवेपासून विस्फोटक पदार्थ तयार करण्याचा शोध लावून महायुद्ध जिंकण्यास जर्मनीला जवळजवळ भाग पाडलं. १९१९ साली 'कारपॉफ'नं रशियातील युद्धोपयोगी रासायनिक उद्योगधंद्याची जबरदस्त संघटना करून रशियन क्रांति यशस्वी करून दाखविली. इतिहासाच्या वाचकाला परिचित असलेल्या, विल्यम प्रिन्स ऑफ ऑरेंज, डॅटन, रोबेस्पीयर, लॉइड जॉर्ज, कैसर व ट्रॉट्स्की वगैरे वीरांपेक्षा शास्त्रज्ञांचं महत्त्व कमी आहे असं नव्हे. झारच्या रशियाला नसलेलं महत्त्व साम्यवादी रशियाला जागतिक राजकारणात प्राप्त झालं आहे, याचं कारण म्हणजे साम्यवादी रशियानं केलेली वैज्ञानिक प्रगति.

मराठ्यांचं राज्य गेलं, भारतवर्ष पराधीन बनला, हे भारतीयांच्या अंतर्मुखी वृत्तीमुळं. बाहेरच्या जगांत काय चाललं आहे याचा गंध देखील तत्कालीन भारतीयांना नव्हता. जेव्हा युरोपियन लोकांची लढाऊ व व्यापारी जहाजं महासमुद्रांतून यथेच्छ प्रवास करीत होतीं, तेव्हा भारतीय लोक समुद्रोल्लंघन म्हणजे महापाप

आहे असा खुळा समज उराशी बाळगून बसले होते. आपल्या पूर्वजाच्या खुळेपणाचे फळ आज आपण भोगत आहो.

यंत्राच्या शोधामुळ उत्पादनपद्धतीत क्रांति झाली. जुन्या मंदगति साधनाचा लोप होऊन नवीन शीघ्रगति यंत्र उदयास आली उत्पादनपद्धतीतील क्रांतिमुळ समाजाच्या रचनेत, शासकशासित संबधात क्रांति होण आवश्यक होत ते काम सुधारलेल्या स्वतंत्र देशात क्रांत्यानी व परतंत्र किंवा मागसलेल्या देशात परकीय आक्रमणानी केल.

ही मानवसमाजाच्या विकासातील तिसरी क्रांति. या क्रांतिमुळ शेतकीप्रधान सरंजामशाही नष्ट होऊन यंत्रप्रधान भांडवलशाही स्थापन झाली.

---

# भांडवलशाही : : ६

यत्रयुगाच्या आगमनामुळ सरजामशाहीचा लोप होऊन भाडवलशाही अधिष्ठित झाली सरजामशाहीत जमीन हीच एकमेव उत्पादनाच साधन असल्यामुळ जमीनदार ह शासकवर्गाचे मुख्य घटक असत औद्योगिक क्रातीनतर ही व्यवस्था बदलली. शासकवर्गात व्यापारी वर्गाचा प्रामुख्यान अतर्भाव होऊ लागला व आजमितीला जागतिक राजकारणाची सूत्र मोठमोठ्या व्यापारी कुबेराच्याच सगतीन हलत आहेत.

यत्रयुगाचा इतिहास म्हणजे मनुष्यान मनुष्यावर केलेल्या राक्षसी अत्याचाराची करुण कहाणी करवतीन डोक कापण, लालभडक तापलेल्या भट्टीत भाजण, पाचपचवीस विषारी विचू व साप अगावर सोडण, इत्यादि वर्णन केल म्हणजे, यमपुरीतील भयानक दृश्याच सनातनी पद्धतीच एक चित्र मिळत त्याचच तर वर्णन नसेलना, अशी शका येते. परतु दक्षिण अमेरिकेतील पुट्टुमायो व आफ्रिकेतील कॉगो येथील रबराच्या जगलातील हलकट युरोपियन राजाची व व्यापाऱ्याची नीचतम कृष्णकृत्य पाहिली म्हणजे मनुष्याची नीचता कोणत्या थराला जाऊ शकते याच सखेद आश्चर्य वाटत, व यमपुरीच वर्णन काल्पनिक असल्याबद्दलची विधान सशयात्मक वाटू लागतात. स्त्रीपुरुषाचा व मुलाचा जनावराप्रमाण

व्यापार करणे, संख्यावृद्धीकरिता त्याचे जबरी संभोग घडवून आणणे, ओल्या कातडीच्या चाबकाने मारणे, मालकाच्या मौज-खातर मजुराला झाडाला बांधून बंदुकीचा नेम शिकण्यासाठी निशाण म्हणून उपयोग करणे, काळ्या मजुरांना गोऱ्या माणसाचे मूत्रपान करण्यास भाग पाडणे, रबर तयार करण्यात थोडीशी चूक झाली की ते रबर खावयास लावणे, इत्यादि लिहिणाराच्या लेख-णीला कलंकित करतील असे किळसवाणे प्रकार द्रव्यलोलुप राजांनी व व्यापाऱ्यांनी अमलात आणले. वर्तमानपत्रांना लाच देऊन लोकांच्या डोळ्यात धूळ झोकून, सरकारी कर्मचाऱ्यांना पैसे चारून आपल्या अधर्मवृत्तीची जोपासना बेल्जियमचा राजा दुसरा लिऑपोल्ड याने चालू ठेवली. गेल्या महायुद्धात रणांगणावर जितके लोक पडले नसतील तितके या राजाच्या द्रव्यलोभाला बळी पडले.

या राक्षसी कर्माची वर्णने ऐकण्यासाठी माणसाला माणुसकी सोडावी लागेल. अशाच प्रसंगाचे वर्णन चालू असता लेखणी थांब-वून एच. जी. वेल्स म्हणतो. 'या गुन्हेगारांनी अमलात आणलेले अत्याचार इतके राक्षसी व भयंकर आहेत की, त्याच्या कर्त्यांना मनुष्य म्हणणे मूर्खपणाचे होईल. या नारकीय यातनांचे वर्णन अर्थ-शास्त्राच्या विद्यार्थ्यांकरिता नसून गुन्हेगारांच्या मानसशास्त्राचे जे अभ्यासक आहेत, त्यांच्याकरिता आहे.'

यंत्रयुगाच्या प्रगतीचा इतिहास मागसलेल्या लोकांच्या रक्ताने लिहिला गेला आहे. इतिहास मुक्तकंठाने याची साक्ष देत आहे.

परदेशातील लोकांना नागवून स्वदेशातील लोकांची लाज राखणे, विदेशातील लोकांना भुकेकंगाल बनवून मायदेशातील लोकांची खळगी भरणे जोपर्यंत शक्य होते, तोपर्यंत प्रगतीचा गाडा सुरळीत चालला. परदेशातील पाशवी अत्याचाराकडे माय-देशातील लोकांनी डोळेझाक केली. पण शासित देशातील दलित लोक जेव्हा सावध झाले तेव्हा शासक देशाला देखील परिस्थितीचा चटका बसू लागला. नवीन यंत्रांच्या शोधामुळे व शासित देशातील राष्ट्रीय

भावनेमुळे शासकांच्या मायदेशात बेकारी वाढू लागली. बेकारीचा हा भयंकर रोग पंचखंड पृथ्वी व्यापून उरला. जगातील सर्वश्रेष्ठ बलवत्तम साम्राज्यसूर्याला देखील बेकारीचे ग्रहण लागले व ' रूल, ब्रिटॅनिया ! रूल द वेव्ज्, ब्रिटन्स शॅल नेव्हर बी स्लेव्हज् ' असे विजयोन्मादाने गाणाऱ्या ब्रिटिश लोकांच्या साम्राज्याचे माजी सूत्रधार मॅकडोनाल्ड व चेंबर्लेन यांनी जाहीर केले आहे की, भांडवलशाही ब्रिटनमध्ये ज्यांना कधीहि काम मिळण्याची आशा नाही असे वीस लाख ब्रिटिश लोक नेहमीकरिता बेकार पडले आहेत

उत्पादनसाधनांच्या वैयक्तिक मालकीमुळे संपत्तीचे केंद्रीभवन सुरू झाले यंत्रांच्या प्रगतीमुळे जीवनोपयोगी सामग्रीच्या उत्पादनार्थ फारच थोड्या मनुष्यांची आवश्यकता भासू लागली. यंत्रांची प्रगति व मनुष्यबळ यांचे व्यस्त प्रमाण असल्यामुळे जशी यंत्रे वाढली तशी बेकारीहि वाढली यांत्रिक सुधारणा व बेकारी यांच्यामधले साहचर्य इतके वाढले की, सुधारलेला देश म्हणजे बेकारांचा देश असा ध्वन्यर्थ निघू लागला

संपत्तीच्या केंद्रीभवनामुळे बाजारातील माल विकत घेण्यास लोकांजवळ पैसा उरला नाही व उत्पन्न केलेला सबंध माल स्वत. उपभोगण्याचे सामर्थ्य भांडवलदारांत नाही लोकांना मालाची गरज असतांना तो विकत घेण्यासाठी लोकांजवळ पैसा नाही व ज्यांच्याजवळ पैसा आहे त्यांना मालाची गरज नाही. ' चणे आहेत तिथे दात नाहीत व दात आहेत तिथे चणे नाहीत ' ही मराठी म्हण येथे शब्दशः लागू पडते

अमेरिकेत तेलाच्या उत्पत्तीचा शेकडा पंच्याण्णव भाग 'ऑइल ट्रस्ट ऑफ अमेरिका' या संघाच्या हातात आहे. शेकडा पन्नास टेलेफोन व टेलेग्राफ एकाच कंपनीच्या हातात आहेत. ' युनायटेड स्टील कॉर्पोरेशन ऑफ अमेरिका ' ही लोखंडाचा व्यापार करणारी जगातील सर्वांत मोठी कंपनी आहे. जगात जितक्या मोटारी

तयार होतात, त्यापैकी तीन चतुर्थांश मोटारी जगातील केवळ पाच कंपन्या तयार करतात.

जपानमध्ये मित्सुई, मित्सुबिशी, सुमिटोमो, यासुडा आणि ओकुरा हे पाच जपानी कुबेर म्हणजे जपानच्या आर्थिक जीवनाचे पंचप्राण आहेत. जपानी राष्ट्राच्या एकदर संपत्तीचा शेकडा बासष्ठ भाग या पाच कुबेराच्या ताब्यात आहे

फ्रान्समधील साडेचार कोटी लोकांचं भवितव्य ' बँक ऑफ फ्रान्स'च्या दोनशे वरिष्ठ भागीदाराच्या हातात होते. फ्रान्समधील क्रूसॉट येथील युद्धोपयोगी सामान तयार करणाऱ्या स्नेडरच्या कंपनीने १९३२ साली सर्व जगात तयार झालेल्या दारूगोळ्याचा एक चतुर्थांशापेक्षा अधिक भाग तयार केला.

प्रसिद्ध लोखंडाचा कारखानदार थायसेन, दारूगोळ्याचा व्यापारी क्रुप, विजेच्या सामानाचा कारखानदार सीमन्स व रंगाच्या व्यापारावर कोट्यधीश झालेला प्रो. बॉश यानी केलेल्या आर्थिक साहाय्यात हिटलरच्या यशस्वी राजकारणाचं मूळ आहे

इंग्लंडमधील मालमत्तेचा शेकडा चौसष्ट भाग शेकडा दोन लोकांच्या ताब्यात आहे नेविल चेंबर्लेन, लॉर्ड बाल्डविन, लॉर्ड रन्सिमन व लॉर्ड लडनडेरी हे नावाजलेले पुढारी लक्षाधीश व्यापारी आहेत लॉर्ड हॅलीफॅक्स व लॉर्ड झेटलड हे प्रतिष्ठित जमीनदार आहेत होअर घराण्याने प्रस्थापित केलेली व अजून चालू असलेली एक बँक आहे व सर मॅम्युएल होअर हे सर्वांच्या परिचयाचेच आहेत ईटन व हॅरो या श्रीमंत लोकांच्या शिक्षणाकरिता, गरीबाचा त्याना विटाळ होऊ नये म्हणून, स्थापन केलेल्या शाळा आहेत. बाल्डविन जेव्हा मुख्य प्रधान झाला, तेव्हा त्याने मंत्रिमंडळातील सर्व मंत्री हॅरोलाच शिकलेले असले पाहिजेत असा हट्ट धरला. हॅरो दिवाळखोर सिद्ध होऊन सहाव्या मंत्रिपदाकरिता जेव्हा कोणी योग्य उमेदवार मिळेना तेव्हा बाल्डविनने सहावं मंत्रिपद स्वतःकडेच राखून ठेवलं ! स्वतःच्या संपत्तीची केवढी ही

घमेंड व प्रजाजनाविषयी केवढा हा तिरस्कार! ईटन व हॅरो येथील शिक्षणाचा वार्षिक खर्च अनुक्रमे २८५ व २१६ पौंड आहे. शालेय शिक्षणाकरिता महिना कमीत कमी २५० रुपये खर्च करू शकणाऱ्या भाग्यवताच्या चिरंजीवामधून मंत्रिमंडळाचे सभासद निवडले जातात! या शाळामधून शिकलेल्या सर्व विद्यार्थ्यांना 'पब्लिक-स्कूल-टाय' या नावाचा एक रोग जडलेला असतो

वरील विवेचनावरून संपत्ति व सत्ता याचे साहचर्य कसे वाढत गेले आहे हे सहज समजण्यासारखे आहे.

संपत्तीच्या केंद्रीभवनामुळे व्यापारात तेजीमंदीसारखे चमत्कार घडून येतात गरीब लोकाजवळ बाजारातील माल विकत घ्यावयास पैसे नसल्यामुळे लोकांना आवश्यक असलेला माल बाजारात शिल्लक राहतो. माल विकला न गेल्यामुळे बाजारात मंदी उत्पन्न होते व कारखाने बंद ठेवणे भाग पडते. कारखाने बंद पडल्यामुळे मजुराचे धंदेहि नाहीसे होऊन ते निर्धन बनतात व उदरनिर्वाहाच्या वस्तू विकत घ्यावयासाठी पैसे नसल्यामुळे अगोदरच असलेल्या मंदीत अधिकच भर घालतात. अशा वेळी सरकारला व्यापाऱ्यांना मोठाल्या रकमा देऊन गरीब लोकांना स्वस्त दराने माल पुरविणे भाग पडते, किंवा गरीब लोकांना बेकारीचा भत्ता देऊन त्यांची क्रयशक्ति वाढवावी लागते क्रयशक्ति वाढल्याबरोबर बाजारात तेजी येऊन पुनः कारखाने सुरू होऊ लागतात

मंदीमुळे जेव्हा बाजारात मालाला भाव येत नाही, तेव्हा मालाचा तुटवडा पडून भाव वाढावा म्हणून तयार झालेला माल नष्ट करण्यात येतो व मालाची पैदास कमी करण्यात येते

हवामानाच्या व जमीनीच्या दृष्टीने अटलांटिक महासागरातील क्यूबा बेट उसाच्या लागवडीसाठी अत्यंत योग्य असताना व हल्लीपेक्षा अर्ध्या दराने सबंध जगाला साखर पुरविण्याचे सामर्थ्य एकट्या क्यूबात असताना तेथील हजारो एकर जमीन ओसाड

पडली आहे व मायदेशाच्या कुबेराचे खजिने भरण्याकरिता प्रत्येक देशाची प्रजा योग्य किमतीपेक्षा दुप्पट किमतीन ब्रीटची माखर विकत घेत आहे. गरीब लोकाजवळ पैस नसल्यामुळ उत्पन्न झालेली मदी घालविण्याकरिता ब्रॅझिलियन सरकारन शिस्तशीर पद्धतीन केवळ तीन मोसमात शेतकऱ्याकडून सबध जगाला दीड वर्ष पुरण्याइतकी कॉफीची तीन कोटी पोती विकत घेऊन 'अग्नये स्वाहा' करून टाकली ! अमेरिकन सरकारन शेतकऱ्याना अठरा कोट डॉलर्सचा मोबदला देऊन एक कोट एकर कापसाची जमीन पडीत ठेवली. तबाखूच्या बाबतीत देखील अमेरिकन सरकारला हाच उपाय योजावा लागला युनायटेड स्टेट्स व कानडा या-सारख्या, निसर्गतःच गव्हाच्या शेतीला अनुकूल असलेल्या देशा-तून युरोपकडे निर्यात होणारा गहू युरोपियन राष्ट्रानी प्रतिबधक कर बसवून युरोपियन बाजारातून जेव्हा हाकलून लावला, तेव्हा युरो-पातील राष्ट्राना किंचकट, महाग गव्हावर निर्वाह करावा लागला व युनायटेड स्टेट्सच्या सरकारला युरोपमधल्या बाजारबदीमुळ उत्पन्न झालेली मदी टाळण्याकरिता शेतकऱ्याना कोट्यवधि डॉलर्स देऊन गव्हाची लागवट बद करावी लागली गव्हाच्या लागवडीची जमीन साडेसहा कोटी एकर होती, ती चार कोटी झाली

खनिज सपत्तीच्या बाबतीत देखील हीच बुवाबाजी व हाच गोंधळ आढळून येतो. जगातील दोन पचमाश ताब युनायटेड स्टेटसमधून येत. जगातील सर्व ताब्याच्या खाणीवाल्यानी एक गट तयार केला व ताब्याची पैदास मर्यादित करून मनमानेल त्या दरान ताब विकावयास सुरुवात केली. पण नतर आफ्रिकेतील खाणींच्या शोधामुळ ही स्थिति सुधारली. ब्रिटिश व डच माइवल वाल्यानी एकत्र होऊन जगातील कथिलाची पैदास मर्यादित करून किमत इतकी वाढवून ठेवली आहे की, बोलिव्हिया व नायगेरिया येथील अत्यत भिकार खाणीतून पुष्कळ श्रमान निघालेल कथील सुद्धा जगाच्या बाजारात फायद्यानच विकल जात. मिठाच्या बाब-

तीत अत्यंत सुखी असलेल्या राष्ट्रांत हिंदुस्थानाची गणना होत असताना, ब्रिटिशांच्या भांडवलशाही धोरणामुळे एडन व आफ्रिके-मधून हिंदुस्थानाला मीठ मागवावे लागत.

मनुष्यजातीला विज्ञानानें प्राप्त करून दिलेली सुखमय जीवन व्यतीत करण्याची शक्यता व त्या शक्यतेची प्रत्यक्षांत परिणति यांच्यामध्ये जगातील भांडवलशाही कशा प्रकारें विघ्नरूप होऊन बसली आहे हे वरील उदाहरणावरून स्पष्ट आहे. मनुष्याच्या जीव-नाला आवश्यक असलेल्या प्रत्येक वस्तूच्या व संस्थेच्या बाबतींत कृत्रिम उपायांनी तुटवडा उत्पन्न करणे व स्वतःचे खिसे भरणे हे भांडवलशाहीचे धोरण आहे. नानारोगांनी कोट्यवधि लोक मरत असतांना डॉक्टर लोक बेकार रहातात. शिक्षणविषयक अठराविश्वे दारिद्र्य चहूकडे पसरलें असतांना शिक्षितांच्या बेकारीसारखे चम-त्कार घडत असतात. लोक भुकेनें मरत असतांना धान्याच्या बाजारांत मंदी उत्पन्न होते व म्हणून लागवड कमी करण्यांत येते. जगांत असलेल्या लोकसंख्येपेक्षां कितीतरी पट अधिक लोक-संख्येला जगविण्याचें सामर्थ्य विज्ञानानें मानवाला दिलें असतांना संख्यावृद्धीसारखे रोग उद्भवतात. भांडवलशाही म्हणजे समाजा-वरचें एक भयंकर दडपण आहे व त्यामुळें समाजाच्या प्रत्येक अंगाची प्रगति स्थगित झाली आहे. समाजाच्या कोणत्याहि अंगाचें निरीक्षण केल्यास नैसर्गिक वैपुल्य असून भांडवलशाहीनें निर्माण केलेल्या कृत्रिम दुष्काळामुळें त्या त्या अंगाची प्रगति बंद पडली आहे असेंच आढळून येईल.

अशा नारकीय परिस्थितींत जग असतांना 'जगांतील दलित लोकांनो, एकत्र व्हा' असें मार्क्स म्हणतो व भांडवलशाहीचा निःपात करण्यास सांगतो. जगांतील दलित लोकांचें ऐक्य म्हणजेच आंतर्राष्ट्रीयत्व. मार्क्सच्या आंतर्राष्ट्रीयत्वाला कुत्सितपणें हसणारे लोक आहेत, ते मूढ असले पाहिजेत किंवा ढोंगी असले पाहिजेत. कारण, दलित जनतेचें आंतर्राष्ट्रीय जग निर्माण होण्यापूर्वीच

भाडवलशाहीच अतर्राष्ट्रीय जग निर्माण झाल. कोणत्याहि एका देशातील दलितानी आपल डोक वर काढल, की भाडवलशाहीच अतर्राष्ट्रीय जग त्या गरीब मूठभर जनतेवर तुटून पडत. ' प्रेमात व युद्धात सर्व काही क्षम्य असत ' या इग्रजी म्हणीस अनुसरून चालविलेल्या या नितान्त अतुल्यबल सामन्यात भाडवलशाही यशस्वी होते

पहिल्या महायुद्धाच्या शेवटी पक्षद्वयाची सैन्य जेव्हा लढतच होती, तेव्हा सर्व भाडवलशाही जग शत्रुमित्रभाव विसरून रशियन साम्यवादाचा नायनाट करण्यास एकजीव झाल होत. जेव्हा 'चँग-कै-शेक' न अदूरदर्शीपणान चिनी कम्यूनिस्टाचा पाडाव करण्याचा अयशस्वी व अघोरी प्रयत्न केला, तेव्हा अतर्राष्ट्रीय भाडवलवाल्यानी व चीनच्या जीवाभावाच्या शत्रून–जपानन देखील चँगला मदत केली! आपापल्या देशातील भाडवलशाहीचे प्रतिनिधि हिटलर, मुसोलिनी व चेंबर्लेन, स्पेनच्या नवजात लोकसत्तेच्या नाशास कारणीभूत झाले परदेशी भाडवलवाल्याना योग्य मोबदला देऊन मेक्सिकोतील तेलाच्या खाणी राष्ट्रीय मालकीच्या करावयाच्या अस जेव्हा मेक्सिकन सरकारन ठरविल, तेव्हा अतर्राष्ट्रीय भाडवलवाल्यानी तीव्र विरोध केला. अशा प्रकारे भाडवलशाहीचे अतर्राष्ट्रीय सबध राष्ट्रीय लोकसत्तेस हानिकारक होऊ लागले आहेत अशा प्रसगी प्रत्येक राष्ट्रातील व्यक्तीव्यक्तीच कर्तव्य तिच्या पक्षाभिमानाप्रमाण भिन्न होऊ लागत स्पॅनिश युद्धात भाडवलशाही ब्रिटिश सरकारन बडखोर फ्रँकोला मदत केली, लोकसत्ताप्रिय ब्रिटिश जनतेन न्याय्य लोकसत्ताक स्पेनला मदत केली, राल्फ फॉक्स या तरुण इग्लिश लेखकान स्पॅनिश लोकसत्तेच्या सरक्षणार्थ आपले प्राण खर्ची घातले व जे. बी एस. हाल्डेन हा प्रसिद्ध ब्रिटिश वैज्ञानिक आपल युद्धविषयक ज्ञान स्पॅनिश लोकसत्तेच्या सेवेस सादर करण्यास गेला. फ्रेंच भाडवलशाही इंग्लिश भाडवलशाहीच्या सहकार्यान तटस्थतेच नाटक करीत होती व फ्रेंच काम-

गार जीवाच मोल देऊन स्पॅनिश लोकसत्तेच संरक्षण करीत होत. अंतर्राष्ट्रीय भाडवलशाही जर स्वरक्षणार्थ सहकार्य करू शकते तर अंतर्राष्ट्रीय लोकशाही सुद्धा तीच मात्रा योजू शकते, हे स्पॅनिश युद्धात 'इंटर नॅशनल ब्रिगेड'न दाखविल.

अंतर्राष्ट्रीय भाडवलशाहीच सहकार्य इतक्या नीचतम कोटीला जाऊन पोहचलेल आहे की, कारखानदारानी धनलोभान स्वदेशाच स्वातंत्र्य देखील विकावयास कमी केलेल नाही. "ब्रिटिश लोकांच्या विरुद्ध लढण्याकरिता म्हणून जर सरहद्द प्रांतातील दंगेखोराना शस्त्राची गरज पडली, तर ते सहज एखाद्या ब्रिटिश कंपनीकडून विकत घेऊ शकतील. तुर्कस्थान व बल्गेरिया यांचे प्रतिनिधि, फ्रेंच व्यापारी स्नेडर यांचेजवळ दारूगोळा विकत घेत असल्याचा फोटो, फ्रेंच चेंबरचा डेप्युटी धूर्त पॉल फॉर यांच्येजवळ होता! तोच दारूगोळा तुर्कस्थान व बल्गेरिया यानी गेल्या महायुद्धात फ्रेंचाना विनमोल, साभार व सव्याज परत केला. याच भयंकर गृहस्था-जवळ, जर्मनीच्या कैसरबरोबर, स्नेडर समुद्रात नौकाविहार करीत असल्याचा फोटो आहे. मोरोक्कोमध्ये जेव्हा अब्दुल करीमन फ्रेंच सत्तेविरुद्ध बंड पुकारल, तेव्हा फ्रेंच कंपन्यानीच त्याला दारूगोळा पुरविला तुर्कांनी ब्रिटिश तोफा ब्रिटिशांवरच डागून डार्डानेल्स-मध्ये विजय मिळविला. ब्रिटिश लढाऊ जहाजाना ब्रिटिश माइन्स-नीच समुद्राचा तळ दाखविला."

* * * *

भाडवलशाहीच्या अमलाखाली जितकी प्रगति शक्य होती तितकी झाली. ज्या यांत्रिक प्रगतीमुळ भाडवलशाहीचा जन्म झाला व ती वाढली, त्याच प्रगतीमुळ भाडवलशाहीचा अंत होत आहे. यांत्रिक प्रगतीकरिता समाजाची रचना आमूलाग्र बदलण अत्यंत आवश्यक झाल आहे. भाडवलशाही समाजात यंत्राच्या प्रगतीबरोबर बेकाराच्याहि संख्येची प्रगति होत असल्यामुळ, वैज्ञा-निकानी लाविलेल्या अद्भुत शोधाना व्यवहार्य करण्यास तेथे वाव

नाही. १९३२ साली रूझवेल्ट प्रेसिडेंट होण्याच्या पूर्वी, युनायटेड स्टेट्समध्ये बेकाराची सख्या एक कोटी सत्तर लक्ष होती. नतरच्या चार वर्षात इतकी यात्रिक प्रगति झाली की, ती यत्र उपयोगात आणल्यास, बेकाराची सख्या अडीच कोटीपर्यंत जाण्याचा संभव दिसू लागला.

अशा परिस्थितीत भाडवलशाहीत आमूलाग्र फरक होण अपरिहार्य झाल आहे. १९१७ मधील प्रसिद्ध क्रातीमुळ रशियात हा फरक घडून आला या क्रातीन भाडवलशाहीची सत्ता नष्ट झाली. उत्पादनाच्या सर्व साधनावर जनतेची मालकी प्रस्थापित झाली. ही मानवसमाजाच्या विकासातील चौथी क्राति.

भाडवलशाहीन अंतर्राष्ट्रीयत्वाला जन्म दिला आणि याच अतर्राष्ट्रीयत्वाच्या विकासाला भाडवलशाही विघ्नरूप असल्यामुळ ती नष्ट होऊ पहात आहे. भाडवलशाहीमुळ यत्राची प्रगति झाली व यत्राच्या प्रगतीमुळ भाडवलशाहीचा नाश होत आहे. थडी वाजू नये म्हणून मनुष्य कपडे घालतो व तो कपडे घालतो म्हणून थंडीवाऱ्याच्या बाबतीत ससर्गक्षम बनतो. मनुष्य परिस्थिति बदलतो व परिस्थिति मनुष्याला बदलते साम्यवादी जगात मनुष्य समाजाकरिता निर्वेतन काम कस करील व साम्यवाद्याच प्रसिद्ध ध्येयवाक्य ‘ शक्त्नुसार उत्पत्ति व आवश्यकतेनुसार प्राप्ति ’ कस अमलात येईल, याच वरवर विचार करणाराला आश्चर्य वाटत. भाडवलशाही जगात मनुष्य दुसऱ्याकरिता राबत आहे, लोकशाही जगात तो स्वतःकरिता राबणार नाही अस म्हणण हास्यास्पद आहे. भाडवलशाही जगात खाजगी मालमत्तेची चोरी दण्डनीय मानली जाते, साम्यवादी जगात जनतास्वरूप जनार्दनाच्या मालमत्तेची चोरी दडनीय राहील. भाडवलशाही जगात लोकाना लुबाडण क्षम्य आहे, लोकशाही जगात भाडवलवाल्याना लुबाडण क्षम्य राहील. भाडवलशाही जगात बेकार राहण्याच स्वातत्र्य आहे, लोकशाही जगात काम करण्याच स्वातंत्र्य राहील. भाडवलशाहीत

उपाशी मरण्याचं स्वातंत्र्य आहे, लोकशाहीत यथेच्छ खाऊन जिवंत राहण्याचं स्वातंत्र्य राहील.

उत्पादन साधनांतील प्रगतीमुळं समाजात क्रांति आवश्यक झाली आहे. उत्पादनाची साधनं व समाजाची रचना, यांच्यातील अत्यंत निकट संबंध पुनः प्रस्थापित होतो.

---

# रशियन क्रांति : : ७

१९१७ तील रशियन क्रांति होऊन जगाच्या एकषष्ठांश भागा वर लोकशाही प्रस्थापित होण्यापूर्वी, साम्यवादी सत्तेखाली समाजाच काय स्वरूप राहील, हा केवळ तर्काचा विषय होता. पंचवीस वर्षांच्या लोकशाहीन रशियाला जगात अत्यत मानाच स्थान प्राप्त करून दिल आहे व कोणीहि लोकशाहीचा पुरस्कर्ता शुष्क तर्कवादाचा आश्रय न करता, झटकन् रशियाकड बोट दाखवू शकतो.

जेव्हा रशियन क्रांतीला आरभ झाला, तेव्हा महायुद्ध चालूच हौत. केवळ दोस्तराष्ट्राना खूष ठेवण्याकरिता म्हणून झारन हे युद्ध चालू ठेवल होत. भांडवलशाहीतील अतर्विरोधामुळ उत्पन्न झालेली ही लढाई असून या लढाईपासून रशियाला काडीचाही फायदा नाही, अस लेनिन वगैरे बोल्शेव्हिस्टानी युद्धापूर्वीच जाहीर केल होत.

महायुद्धात रशियाची भयकर हानि झाली. सैनिक, दारूगोळा. सेनापति, या सर्वच बाबतीत झारच सरकार दिवाळखोर ठरल्यामुळ, जर्मनीच्या सुसज्जित सैनिकानी व पल्लेदार तोफानी झारच्या सैन्याचा धुव्वा उडविला. केवळ मनुष्यबळाच्या जोरावर झार रशिया लढवीत होता. म्हणून महायुद्धात मनुष्यहानीच्या बाबतीत रशियाचा नंबर पहिला लागतो. अशा खेदजनक परिस्थितीत

रशियन सैनिक असताना, लढाईमुळ उत्पन्न झालेल्या महागाईचा फायदा घेऊन भांडवलवाले गब्बर झाले. या ' स्वदेशप्रेमी भांडवलवाल्याना रशियान शेवटपर्यंत युद्धात भाग घ्यावा असच वाटत होत. कोणत्याहि भांडवलवाल्याला, युद्धजन्य महागाईन होणाऱ्या फायद्यामुळ युद्ध हवसच वाटणार व युद्ध नच झाल तर आम्ही काही तरी कुरापती काढून युद्ध निर्माण करतो, ' अस प्रांजळपण सांगणार भांडवलदार आहेतच

या वेळचा झार निकोलस अत्यत मूर्ख मनुष्य होता अस इतिहास सागतो फ्रेंच क्रांतीच्या वेळचा सोळावा लुई हा देखील मूर्खच होता दोघाच्याहि बायका नवऱ्यापेक्षा शिरजोर होत्या अशी उदाहरण पाहून इतिहासाच्या पुनरावर्तनाचा सिद्धात खरा वाटू लागतो. हिटलर व मुसोलिनी याचा आततायीपणा प्रसिद्धच आहे व भावी इतिहासकार याना निकोलस आणि लुई याच्या मालिकेत नेऊन बसवितील, याबद्दल शंका बाळगण्याच काहीच कारण नाही. राजसत्ताक युरोपन लुईला मदत केली, भांडवलशाही जगान निकोलसला किंवा त्याच्या प्रतिनिधींना मदत केली. फ्रेंच क्रांति इतिहासाचा विषय असल्यामुळ, आपण तिच्याकडे निःपक्षपातान पाहू शकतो राजसत्ताक युरोप प्रतिगामी होत व फ्रेंच क्रांतीन नेपोलियनसारख्या जगद्वंद्य वीराच्या साहाय्यान पुरोगामी भांडवलशाहीच्या विकासाचा मार्ग मोकळा करून दिला असा निवाडा देण्यास इतिहासकार कचरत नाही पण रशियन क्रांति हा प्रचलित राजनीतीचा विषय आहे. या वेळी भांडवलशाही जगात आपसात लाथाळी चालली असून स्वार्थापुरती रशियाच्या सहकार्याची अपेक्षा दोन्ही युद्ध्यमान पक्ष करीत आहेत. नेपोलियनची भूमिका लेनिनन पार पाडली आहे. प्रतिगामी भांडवलशाही व पुरोगामी लोकशाही याच्यात विरोध चालू आहे. राजसत्ताक युरोपमध्ये फ्रेंच क्रांतीचा पुरस्कार करण अक्षम्य गुन्हा होता, भांडवलशाही जगात रशियन क्रांतीचा पुरस्कार करण अक्षम्य गुन्हा

आहे. फ्रेंच क्रांति जेव्हा राजनीतीचा विषय होती, तेव्हा तिला राजसत्तेने अन्यायी ठरविलें, रशियन क्रांति ही अजून राजनीतीचा विषय आहे, म्हणून तिला भांडवलशाही जग अन्यायी ठरवीत आहे. फ्रेंच क्रांतीने जगाच्या प्रगतीचें पाऊल पुढेंच पडलें असें इतिहास अट्टाहासानें प्रतिपादत आहे. रशियन क्रांतीनेंहि असेंच झालें हें इतिहास प्रतिपादन करील यांबद्दल संशय घेण्याचें कारण नाहीं

व्हॉल्टेर आणि रूसोसारख्या प्रभावी लेखकांनी असंख्य यातना सहन करून नवीन क्रांतितत्वाचा प्रचार केला रोम रोलाँ, हेन्री बार्बूजी पाम दत्त जॉन स्टॅचे, राल्फ फॉक्स, अप्टन सिंक्लेर व आपल्या देशातील मुल्कराज आनंद, मानवेंद्रनाथ रॉय, जवाहरलाल नेहरू वगैरे लेखक बदललेल्या परिस्थितीत व्हॉल्टेर आणि रूसोचीच भूमिका पार पाडीत आहेत जन्मभर निर्वासित असलेला व्हॉल्टेर १७७८ सालीं वयाच्या चौऱ्याशीव्या वर्षी जेव्हा पॅरिसला आला, तेव्हां तरुणांना उद्देशून केलेल्या एका भाषणांत तो म्हणतो 'आजची तरुण पिढी अत्यंत भाग्यवान आहे, तिला अत्यंत महत्वाच्या घडामोडी पहावयास मिळतील.' प्रसिद्ध रशियन कादंबरी मदर चा कर्ता मॅक्झिम गॉर्की यानें, लहान मुलाच्या संगतीने लेनिननें अशाच आशयाचे उद्गार काढल्याचें नमूद करून ठेवलें आहे-' यांचें जीवन अधिक सुखमय होईल, आपल्यासारखे कटु अनुभव यांना येणार नाहीत आपल्या इतक्या यातना यांना भोगाव्या लागणार नाहीत ' फ्रेंच क्रांतिकालीन प्रसिद्ध लेखक रूसो म्हणतो ' मानवजाति गरीब जनतेची बनलेली आहे व जे गरीब नाहीत त्यांच्याशी मनुष्यजातीला इतकें अल्प कर्तव्य आहे की, ते कोण व किती आहेत हे जाणण्याचे परिश्रमसुद्धा व्यर्थ आहेत क्रांतीच्या पूर्वी लेलिनने म्हटलें होतें, " आपली चळवळ बहुजनसमाजाच्या आधारावर उभारली पाहिजे. थोडे दिवस आपण अल्पसंख्याक राहिलों किंवा आपल्याला

पुढारीपणा न मिळाला तरी हरकत नाही. बहुजनसमाजावर आधारलेली चळवळच खरी. खऱ्या राजनीतीला तेथूनच प्रारंभ होतो.' फ्रेंच क्रांतीत फौजेनं गोळीबार करावयाचं नाकारलं, रशियन क्रांतीत कोसॅक्सनीहि तेच केलं. फ्रेंच क्रांतीतील प्रसिद्ध पुढारी डॅंटन यानं एका भाषणांत म्हटलं आहे, 'राजसत्ताक युरोप आम्हाला युद्धास आव्हान देत आहे. हे लुईचं मुंडकं आव्हानाची स्वीकृति म्हणून आम्ही त्यांचेकडे पाठवू', बोल्शेविकांना झार निकोलसचा वध करावयाचा नव्हता, पण जेव्हा अचानकपणे वध झाला, तेव्हा बोल्शेविकांनी झारचा वध न्याय्य होता असं समर्थन करून सबंध जगाचं वैर विकत घेतलं. फ्रेंच क्रांतींत जितके लोक मेले नाहीत तितके तत्कालीन इंग्लिश व अमेरिकन 'गांतीत' मेले. रशियन क्रांतींत बोल्शेविकांनी जितका जुल्म केला नाही, त्याच्या शंभरपट जुल्म स्वदेशी व विदेशी भांडवलशाहीनं केला, बोल्शेविकांनी एक मनुष्य मारला तर भांडवलशाहीनं रशियांत शंभर मारले' नेपोलियन म्हणतो, 'लढाई ही पुराणवस्तुसंग्रहा-लयांत दाखल केली जाईल, तोफा व बंदुका याच्याशिवाय लढण्याचे दिवस येतील', स्टॅलिन म्हणतो 'ऐतिहासिक विकासाच्या नियमापेक्षा दारूगोळ्याची शक्ति अधिक असं ज्यांना वाटतं, त्यांना म्हातारचळ लागला आहे असं समजावं.' ख्रिस्तीधर्माबद्दल नेपोलियन म्हणतो, 'सॉक्रेटीस व प्लेटोसारख्या विद्वानांना ज्या धर्मानं मूर्खांत काढलं, त्या ख्रिस्ती धर्माचा मी स्वीकार कसा करूं?' पुष्कळ दिवस सोवियेट शिक्षण खात्याचा मुख्याधिकारी राहिलेला लेनिनचा जीवश्चकंठश्च स्नेही ल्युनाचार्स्की म्हणतो, 'येशू ख्रिस्त जर आज जिवंत असता तर अवश्य बोल्शेविक झाला असता', म्हणजे नास्तिक झाला असता.

भांडवलशाहीच्या विकासाकरितां संपत्तीच्या विषम वाटणीची जरूर आहे हे नेपोलियनला माहीत होतं. तो म्हणतो, 'संपत्तीच्या विषमतेच्या अभावीं समाजाचं जीवन असंभव होईल. पण

संपत्तीची विषमता धर्माच्या अभावी टिकू शकणार नाही. भुकेने व्याकुळ होऊन प्राण सोडणाऱ्या कंगाल मनुष्याला, पंचपक्वान्नाच्या भोजनाने ज्याला अपचन होत आहे अशा लक्ष्मीवंताच्या शेजारी शांततेने जगात नांदविण्यासाठी, जन्मांतरी कंगालाचे भाग्य उदयाला येईल ही गोड फसवी धार्मिक कल्पना अत्यंत उपयोगी पडते '

' धर्म ही लोकांची अफू आहे ' असे साम्यवादी प्रतिपादतात साम्यवादी लोक धर्माला भांडवलशाहीचा आधारस्तंभ समजतात धर्म व भांडवलशाही यांना परस्परनिरपेक्ष अस्तित्व नाही भांडवलशाहीबरोबरच धर्माचा नाश होतो. भांडवलशाहीच्या भरभराटीच्या अवस्थेत धर्माची आवश्यकता होती भांडवलशाही जेथे नष्ट झाली तेथे धर्महि नष्ट झाला आहे.

नेपोलियनला पौर्वात्याविषयी अत्यंत आदर होता. तो म्हणतो ' फक्त पूर्वेतच प्रचंड राज्य उदयास आली व प्रचंड उलाढाल्या झाल्या. पूर्व ही साठ कोटी लोकांची जन्मभूमि आहे युरोप पूर्वेच्या पासंगाला पुरणार नाही. '

साम्यवादाचा अवतार पौर्वात्य राष्ट्रांच्या प्रयत्नानेच होऊ शकेल, याबद्दल लेनिन निःशंक होता त्याच्या या भाविष्याला १९३५ साली मूर्तस्वरूप प्राप्त होऊन चीनच्या एक चतुर्थांश भागात साम्यवादाचा अम्मल गाजू लागला. लेनिन म्हणतो ' रशिया, चीन व हिंदुस्थान यांच्यावरच साम्यवादाचे भवितव्य अवलंबून आहे.

नेपोलियन स्वतः होऊन इंग्लिशांचे ताब्यात गेला. राजसंन्यास घेऊन शांतपणे शेवटचे आयुष्य व्यतीत करण्याचा आपला मानस त्याने व्यक्त केला. इंग्लिश लोक तेव्हा ' क्रिकेट खेळावयास ' शिकले नव्हते. तत्कालीन ब्रिटिश परराष्ट्रमंत्री कॅसलरीघ याने या एक वेळच्या अलमगीराला इतक्या कमालीच्या नीचतेने वागविले की, पश्चात्तापाने दग्ध होऊन कॅसलरीघलाच आत्महत्या करावी

लागली!

माडवलशाही राष्ट्र व साम्यवादी रशिया याचे विळ्याभोपळ्या-इतके सख्य आहे. रशिया व इंग्लंड यांच्यात जेव्हा मित्रसंबंध प्रस्थापित होते, तेव्हा दखील लॉर्ड बर्कनहेडने रशियन मुत्सद्द्यांना खुनी मारेकऱ्यांची टोळी असा जाहीर केल्याचे प्रसिद्धच आहे.

लुई व झार अत्यंत मूर्ख होते व दोघानाहि जिवंत मारण्यात आले. नेपोलियन व लेनिन दोघेहि चाणाक्ष मुत्सद्दी होते. आश्चर्याची गोष्ट ही की त्यांच्या शरीररचनेत सुद्धा साम्य होते. नेपोलियन पाच फूट तीन इंच उंच होता; लेनिन चार फूट अकरा इंच उंच होता! सीझर, अलेक्झांडर प्रभृति सेनानी देखील गिड्डेच होते. मिलिटरी व नॉनमिलिटरी असे कृत्रिम व अज्ञानद्योतक भेद निर्माण करणाऱ्या ब्रिटिश सरकारचे जणू विधात्याने विडंबनच चालविले आहे!

लुई व झार यांच्या कारकीर्दीतील अत्याचार प्रसिद्धच आहेत. 'विनाशकाले विपरीतबुद्धिः'—विनाश जवळ आला असता बुद्धि भ्रष्ट होते किंवा याचे अर्थान्तर 'प्रत्यासन्नविपत्तिमूढमनसां प्रायो मतिः क्षीयते' या न्यायाने अनुसरून ज्याप्रमाणे रावणाला परस्त्री-हरणात, युधिष्ठिराला फाशात व रामचंद्राला सुवर्णमृगाच्या संभव-नीयतेत दोष दिसला नाही त्याचप्रमाणे लुई व झार यांना आपल्या अत्याचारांचे परिणामी दोष दिसले नाहीत असेच म्हणणे प्राप्त आहे.

फकीरापासून प्रधानाच्या पदाला पोहचलेला झारचा मीच हस्तक रासपुटीन याचा राजघराण्यातील एका माणसाने खून केला आणि या जुलमी झारचे शासन संपुष्टात आणण्याकरिता वरील वर्गात कारस्थाने चालू झाली.

८ मार्च १९१७ रोजी क्रांतीला आरंभ झाला. पेट्रोग्रॅडमधील सर्व मजुरांनी व्यापक संप पुकारला. शहरातील सडकांवरून क्रांति-कारक वाक्यांचा जयघोष करीत मजुरांचा समुदाय फिरू लागला.

या सपवाल्याच्या पाडाव करण्याकरिता पाठविलेली फौज सपवाल्या-नाच मिळाली इतर शहरातून व खेड्यापाड्यातून ही चळवळ जोरान पसरली जनतेनच क्रातीला आरंभ केला होता व शेवट-पर्यंत तिच नेतृत्व जनतेकडेच होत. लेनिन व इतर बाल्शेविक पुढारी या वेळी निर्वासित होते व क्रातीच्या यशस्वितेच पूर्ण श्रेय जनतेच्याच पदरी पडत

योग्य नेतृत्वाच्या अभावी पुढे काय कराव हे लोकाना कळेना त्यानी झारला हाकलून दिल व सर्व सत्ता श्रीमत लोकाच्या ड्यूमा नावाच्या एका सभेला देऊन टाकली शेवटपर्यंत नेटान महायुद्ध चालू ठेवण्यात याव असच या सभेच मत पडल

झार व त्याचे अनुयायी यांच्यावर अधिष्ठित असलेल्या रशिया-तील सरंजामशाहीचा लोप होऊन भांडवलशाही अधिकारारूढ झाली. मार्चमधील क्रातीमुळ हा फरक घडून आला फ्रेंच क्राति व तत्सदृश 'बूर्जा डेमोक्रॅटिक रव्होल्यूशन्स' या नावान इतिहासाला परिचित असलेल्या सरंजामशाहीच्या उच्चाटनार्थ झालेल्या इतर क्राल्या, यातच या मार्चमधील क्रातीचा अतर्भाव होतो या क्रातीत सरंजामशाहीचा लोप होऊन भांडवलशाही अधिकारारूढ झाली

लेनिन हा निर्वासित असून महायुद्धाच्या दिवसात ता स्वित्झर-लंडमध्ये होता त्याची युद्धविरोधी मत जर्मनीच्या चागल्या परिचयाची होती ड्यूमाचा शेवटपर्यंत युद्ध चालविण्याचा निश्चय पाहून लेनिनला रशियात पाठवून दिल्यास आपला कार्यभाग होईल या स्वार्थी इच्छेन प्रेरित होऊन, जर्मनीन लेनिनला अत्यत काळजी-पूर्वक रशियात पाठवून दिल पूर्वकडील युद्ध थाबल्यास आपल सर्व लष्करी सामर्थ्य पश्चिमेकडे केंद्रित करून दोस्तराष्ट्राना जमीनदोस्त करता येईल, असा जर्मनीचा डाव होता

रशियात येऊन लेनिनन सबध परिस्थितीच अवलोकन केल व व त्याच्या भावी थोरपणाला साजेशी मुत्सद्देगिरी दाखवून रशियन समाजात त्यान भावी क्रातीच बजारोपण केल. बहुजनसमाजाच्या

जीवनाशी अत्यंत जिव्हाळ्याचे संबंध असलेल्या तीन विषयाकरिता बोल्शेविक लोक लढत आहेत असं जाहीर करून त्यानं लोकांचं पाठबळ संपादन केलं. ते तीन विषय म्हणजे (१) लोकसत्ताक राज्यपद्धति, (२) जमीनीवर लोकांची मालकी (३) कामगारां करिता आठ तासांचा दिवस.

कामगारांचा व शेतकऱ्यांचा प्रचंड समुदाय साम्यमय संसाराच्या संभवनीयतेच्या स्वप्नाचा साक्षात्कार सृष्टींत प्रत्यक्ष कसा घडून येतो हे अजमावण्यासाठीं सोत्कंठ झाला. बोल्शेविझम् म्हणजे कशाशी खातात हे माहीत नसलेल्या जनतेमधून असंख्य बोल्शेविक निर्माण झाले कारण बोल्शेविक चळवळ म्हणजे संस्कृति नव्हती सुधारणा नव्हती. शांति नव्हती, क्रांति नव्हती, हिंसा नव्हती. अहिंसा नव्हती. ती एकच होती भगवान श्रीकृष्णानी गीतेंत म्हटल्याप्रमाणे.—' अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमास्थित.' नवविद्याति कोटी दरिद्री नारायणाच्या उदरांत वैश्वानररूपानं वर्तमान असणाऱ्या सर्वात्मरूप जगन्नियंत्याची पूजा होती. महात्मा गांधींनी म्हटलं आहे, ' गरिबांना आपला साक्षात्कार घडून यावा असं जर ईश्वराला वाटलं तर त्यांच्यासमोर तो भाकरीच्याच रूपानं अवतरेल '

ही पूजा कोणाला अप्रिय असते ? नास्तिक व आस्तिक, मूर्ख व पंडित, गावंढी व सुधारलेले, सर्वचजण ' पत्रं पुष्पं फलं तोयम ' जे काही लाभेल, त्यानं ही पूजा करतात देव भावाचा भुकेला असतो म्हणतात नुसत्या पूजेच्या अभिवचनानं देव संतुष्ट झाला व त्यानं स्वतःच्या भक्ताच्या पूजेला विघ्नरूप असलेल्या दैत्यांचा संहार करून त्याचा उद्धार केला.

कामगारांचा व शेतकऱ्यांचा प्रचंड समुदाय शेतकऱ्यांना मिळून त्यांचं सामर्थ्य वाढलं. मार्चच्या क्रांतींत योग्य नेतृत्वाच्या अभावीं डयूमाला अधिकार देणं जनतेला भाग पडलं होतं. पण लेनिनच्या आगमनामुळं ही परिस्थिति बदलली. लेनिननंतर एकच महिन्याने

न्यूयॉर्कहून ट्रॉट्स्कीदेखील येऊन थडकला व त्याने लेनिनचा पक्ष घेतला

नोव्हेंबरच्या सात तारखेला इतिहासात अपूर्व असलेली ही क्रांति घडून आली. क्रांतिकारक सैन्याचे नेतृत्व ट्रॉट्स्कीकडे होते. युद्ध, रक्तपात, उत्पात, काहीहि न होता ट्रॉट्स्कीच्या सैन्याने सर्व सरकारी विभागावर आपली सत्ता प्रस्थापित केली ज्याप्रमाणे पक्व आलेले फळ आपोआप तुटून पडते, त्याप्रमाणे रशियन सरकार आपोआप नष्ट झाले असे एका ब्रिटिश एजंटाने ब्रिटिश सरकारला पाठविलेल्या रिपोर्टात म्हटले आहे

या वेळी रशियाची परिस्थिति अतिशय अनुकंपनीय होती जर्मनांच्या सुसज्जित व सुशिक्षित सैन्याने कंगाल रशियन सैन्याचा धुव्वा उडविला असल्यामुळे रशियन सैन्य जेरीस आले होते युद्धजन्य दुष्काळामुळे शिपाई, चोर, पोरकी पोरं, यांच्या टोळ्या धुमाकूळ घालीत होत्या चहूकडे दुष्काळ पसरला व देश सर्वत्र दुर्धकंगाल झाला झारच्या अमदानीत अधिकाराच्या पदाला पोहचलेल्या क्रांतिविरोधी लोकांचा सर्व शासनविभागातून सुळसुळाट होता. सर्व विभाग मोडकळीस आले होते शिस्तीचा उबारलेले होते जुन्या कर्मचाऱ्यांनी नव्या सरकारशी सहकार्य करावयाचे नाकारले व तारफळकऱ्यांनी तारा पाठवायचे नाकारले

लेनिन लोकसत्ताक सरकारचा अध्यक्ष झाला व ट्रॉट्स्की परराष्ट्र मंत्री झाला परमावधीच्या अपमानकारक अटी सहन करून जर्मनीशी चाललेले युद्ध थांबविणे रशियाला भाग होते दोन्ही राष्ट्रांचे प्रतिनिधि ब्रेस्ट लिटोव्हस्क येथे भेटले तहाच्या अटीप्रमाणे पश्चिमेकडील रशियन प्रदेशाचा बराच मोठा भाग जर्मनीला देण्यात आला

याच प्रसंगाला अनुलक्षून ट्रॉट्स्कीबद्दल एक मनोरंजक गोष्ट सांगण्यात येते. ट्रॉट्स्कीला जर्मनांनी काही कार्यक्रमानिमित्त निमंत्रित केले व त्याने आपले गबाळे कपडे फेकून उंची सूटमध्ये यावे,

असा हट्ट धरला. लोकसत्ताक राज्याच्या प्रतिनिधीला उंची कपडे वापरणं हराम आहे. असं वाटून ट्रॉट्स्कीनं लेनिनला तारेनं सल्ला विचारला. त्यानं उत्तर दिलं, उंची कपडे घालण्यानंच जर युद्धाचं संकट टळत असेल तर उंची कपडे अवश्य घाल '

अशा प्रकारे महायुद्धांतून आपलं अंग काढून घेऊन अंतःस्थ [illegible] निवारणाकडे लेनिन लक्ष पुरवू लागला. आरंभ्या अमदानीतील शिरजोर कर्मचाऱ्यांची त्यानं हकालपट्टी केली. ज्या नाट-[illegible] त्यांनी राजीखुषीनं तिजोऱ्या उघडावयाचं नाकारलं, त्यांच्या तिजोऱ्या [illegible] फोडण्यांत आल्या. जुन्या सरसेनापतीनं [illegible] आज्ञाभंग केला, तेव्हा त्याची हकालपट्टी झाली व एक [illegible] बोल्शेविक त्या जागी नेमण्यात आला.

लोकशाही रशियन सरकारचा पाडाव करण्याकरिता सर्व [illegible] [illegible] जग एकत्र आलं. मॉस्को म्हणजे परराष्ट्रीय हेरांचा अड्डा झाला होता. ब्रिटिश हेरांचा प्रमुख अधिकारी लोकशाही सरकारला जेरीस आणण्यासाठी त्या वेळी मॉस्कोतच होता. एकमेकांच्या नरड्यांचा [illegible] घोट घेत असलेले उभयपक्ष महायुद्ध चालू असतानाच [illegible] [illegible] लागून लोकशाही सरकारचा अधःपात करण्याचं [illegible] एकत्र होते. आपसांत विरोध झाला तर आम्ही भिन्न [illegible] विरोध आला तर आपण एक, अशी त्यांची नीति होती. [illegible] न्याय त्यांना पटलेला दिसत होता.

परस्परविरोधेन वयं पञ्च च ते शतम् ।
अन्यैः साकं विरोधेन वयं पञ्चोत्तरं शतम् ॥

आपसांत विरोध माजला तर आम्ही पांच व तुम्ही शंभर, पण इतरांशी विरोध झाला तर आपण एकशे पांच '

या नऊ महिन्यांच्या नवजात लोकशाहीला युद्धनीतींत मुरब्बी असलेल्या सबंध अंतर्बाह्य भांडवलशाही जगाविरुद्ध लढावं लागलं नोव्हेंबर ११–१९१८ रोजी युध्यमान राष्ट्रांमध्ये तह होऊन महायुद्ध थांबलं पण जगद्व्यापी भांडवलशाही, आपसांतील वैमनस्य विसरून

रशियन लोकशाहीच्या लाल सैन्याशी लढतच होती. प्रेसिडेंट विल्सनच्या प्रसिद्ध चौदा मुद्यानुसार प्रत्येक राष्ट्राला स्वयंनिर्णयाचा हक्क प्राप्त झाला होता, पण प्रेसिडेंट साहेबांचे भाऊबंद जनरल ग्रेव्हजच्या सेनापतित्वाखाली सैबेरियात रशियन लोकशाहीविरुद्ध लढतच होते. इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स, जपान, जर्मनी इटली, सर्बिया, झेकोस्लोवाकिया, रोमानिया, बाल्टिक राष्ट्र, पोलंड व रशियन भांडवलशाही यांच्याविरुद्ध एकटी लोकशाही टिकाव धरून होती सैबेरियापासून बाल्टिक समुद्रापर्यंत रशियाला प्रचंड रणभूमीचे स्वरूप प्राप्त झाले होते या प्रचंड आक्रमणापासून लोकशाहीच्या संरक्षणाचे काम ट्रॉट्स्कीच्या असामान्य युद्धकौशल्यामुळे यशस्वी रीतीने पार पडले.

रशियन क्रांतीत अत्याचार झाल्याच्या गोष्टी आपल्या ऐकीवात आहेत. मार्चमधील क्रांति जेव्हा झाली तेव्हा लेनिन किंवा त्याचे कोणीच अनुयायी रशियात नव्हते. आणि आश्चर्य हे की, असंख्य प्राणांचे मोल देऊन मिळविलेली सत्ता लोकांनी झ्यूमालाच परत केली ! दुर्दैवाने नोव्हेंबरमध्ये क्रांति न होता झ्यूमाच्या हातातच सत्ता राहती तर रशियाला चात्र की गिळं करण्याचे भांडवलशाही राष्ट्रांना मुळीच कारण राहिले नसते. आज रशिया म्हटल्याबरोबर भांडवलशाही राष्ट्रांच्या पायाची आग मस्तकाला जी चढते ती शांत राहिली असती. राजसत्ता व सरंजामशाही जाऊन भांडवलशाही प्रस्थापित झाली असती. भांडवलशाहीतील अंतर्विरोधामुळे रशियाला इतर राष्ट्रांचे कदाचित वैर पत्करावे लागले असते, पण सध्याप्रमाणे अखिल विश्वाचे वैर विकत घेण्याचा प्रसंग आला नसता.

तर ज्या क्रांतीमुळे रशिया अत्यंत नीच, पाजी, हलकट, बदमाष, नालायक व एवं आंतरराष्ट्रीय राजकारणात अस्पृश्य ठरला, ती नोव्हेंबरमधील क्रांति रक्तशून्य राहिल्याची साक्ष भांडवलशाहीचे प्रतिनिधीच देत आहेत. प्रेसिडेंट विल्सनच्या चौदा मुद्यांप्रमाणे

परराष्ट्रावर आक्रमण करणे दंडनीय अपराध ठरला असताना, लोकशाहीच्या तीव्र मत्सराने प्रेरित होऊन जगातील सर्व भांडवलशाही राष्ट्रे निर्लज्जपणाने रशियावर चालून गेली होती. या अतुल्यबल सामन्यात रशियाला अभूतपूर्व स्वार्थत्याग करावा लागला हा दोष कोणाचा ? रशियाचा ?

सैबेरियात रशियाविरुद्ध लढलेल्या अमेरिकन सैन्याचा सेनापति जनरल ग्रेव्ह्ज म्हणतो 'रशिया म्हणजे एक भयंकर कसाईखाना बनला होता ही गोष्ट त्रिवार सत्य आहे. पण याला कारण बोल्शेविक नव्हते. बोल्शेविकांनी मारलेल्या एका माणसामागणिक भांडवलशाही राष्ट्रांनी शंभर माणसे मारली असे म्हटले तर मुळीच अतिशयोक्ति होणार नाही.'

ही मानव समाजाच्या विकासामधली चौथी क्रांति. या क्रांतीमुळे भांडवलशाही नष्ट होऊन रशियात लोकशाहीची स्थापना झाली.

# लोकशाही : : ८

## रशिया

भांडवलशाही व लोकशाही यांचे जन्मजात वैर असल्यामुळ एकट्या लोकशाही राष्ट्राला भांडवलशाही राष्ट्रांच्या समुदायात शांततेने राहणे अशक्य आहे, असे लोकशाही सरकारला वाटू लागले. स्वार्थाने न प्रेरित होऊन का कोणी, रशियाने इतर दलित राष्ट्रांच्या उद्धारार्थ प्रयत्न आरंभिले.

दलितांच्या दुःखविमोचनात लोकशाहीचा स्वार्थ आहे. दलितांच्या दास्यशृंखला कायम ठेवण्यात भांडवलशाहीचा स्वार्थ आहे.

प्रेसिडेंट विल्सनच्या चौदा मुद्याप्रमाण पोलंड, सर्बिया, बेल्जियम व ऑस्ट्रिया हंगेरी या राष्ट्रांना जर स्वातंत्र्य देण्यात येते, तर आयर्लंड, हिंदुस्थान इजिप्त व फिलिपाइन बेटे, याना स्वातंत्र्य का देण्यात येऊ नये, असा सवाल बोल्शेविकानी प्रेसिडेंट विल्सनला टाकला. झारने केलेल्या गुप्त तहानुसार काही परकीय राष्ट्र अंशतः रशियाच्या अंकित झाली होती. ते सर्व तह नवीन लोकशाही सरकारने रद्द करून, सर्व राष्ट्रांना स्वातंत्र्य दिले. इंग्लंड, इटली व जर्मनी यांच्या भांडवलशाही सरकारानी स्पॅनिश युद्धात बंडखोर फ्रँकोला मदत केली. कारण स्पॅनिश लोकशाहीमुळ स्पेनमधील खाणीतून गुंतलेल्या परराष्ट्रीय भांडवलाला धोका होता. रशियान

लोकसत्ताक स्पॅनिश सरकारला मदत केली, कारण प्रत्येक राष्ट्राच्या स्वयनिर्णयाचा हक्क नष्ट होऊन उदीयमान लोकशाहीचा नाश होऊ लागला होता. ' लेक हसन ' प्रकरणी जेव्हा जपानन नेह मीच्या नीतीस अनुसरून रशियाशी भाडण उकरून काढल व जपानी वकील गिरजोर शिगेमित्सु यान रशियाला धमकावण्याचा प्रयत्न केला, तेव्हा रशियन परराष्ट्रमंत्री लिटविनोव्ह यान दिलेल उत्तर लक्षात ठेवण्यासारख आहे लिटविनोव्ह शिगेमित्सूला म्हणाला, ' महाराज, आपली गैरसमजूत झालेली दिसते. आपण लडनमध्ये नसून मॉस्कोत आहा. आपण इंग्लिश मुत्सद्यावरोबर बोलत नसून सोव्हिएट सरकारशी बोलत आहा हे लक्षात ठेवा ' भाडणाचा काय शेवट झाला हे सागण नलगे

१९२७ साली शस्त्रसन्यासपरिषदेच्या कार्यकर्त्यांना स्वत पूर्ण शस्त्रसन्यासाला तयार असल्याच जेव्हा रशियान सागितल तेव्हा ती थाप आहे अस जगाला सागून भाडवलशाही राष्ट्रांनी रशियाच म्हणण फेटाळून लावल पण पूर्ण शस्त्रसन्यासाला तयार होऊन रशिया म्हणजे थापेबाज राष्ट्र आहे. अस जगाला पटवून देण्याचा दम भाडवलशाहीत नव्हता. कारण रशियाच्च विधान थाप नसून वस्तुस्थिति होती. लोकादरावर आधारलेल्या शासन-सस्थेला अत्याचाराची गरज नाही. साम्राज्याच्या रक्षणार्थ मात्र अत्याचाराची गरज आहे. दोन वर्षांनतर पुनः रशियान सर्व राष्ट्रान शस्त्रबल निम्म करण्यात याव असा ठराव आणला, पण हीहि रशियाची सूचना कोणाहि राष्ट्राला पसत पडली नाही. १९३२ साली जेव्हा अमेरिकेन सर्व राष्ट्राच शस्त्रबल एकतृतीयाशान तरी कमी करण्यात याव असा ठराव आणला, तेव्हा केवळ रशियानच या ठरावाला पाठिंबा दिला. या सर्व हकीगतीवरून सोव्हिएट रशियाची शातिप्रियता निदर्शनास येते

रशियातर्गत शेकडो जातींना व अनेक भाषाभाषींना पहिल्या प्रथम स्वयंनिर्णयाच स्वातंत्र्य मिळाल. ' स्वर्गादपि गरीयसी '

अशा जननी जन्मभूमीला आज हजारो वर्षे ज्यू अंतरला होता. ' धिस् इज् माय नेटिव्ह लँड ' ' ही माझी जन्मभूमि आहे ' हे स्कॉटचे प्रसिद्ध वाक्य उच्चारण्याचे सौभाग्य दुर्दैवहत ज्यूला ऐतिहासिक कालात तरी लाभले नव्हते. सबंध जग म्हणजे त्याच्याकरिता एक मोठी थोरली धर्मशाळा होती पण आज रशियातील ज्यू ' ही पहा माझी जन्मभूमि ' असे रशियाकडे बोट दाखवून म्हणू शकतो साम्यवादी रशियाच्या निर्मितीत लेनिनशी स्पर्धा करणारा ट्रॉट्स्की ज्यू होता. जगातील अत्यंत चाणाक्ष परराष्ट्रमंत्री म्हणून नावाजलेला लिट्विनोव्ह ज्यू आहे. आपला ज्यूपणा त्याला लज्जास्पद वाटत नाही आशियातील लोक गावढळ, गनटी, मूर्ख व सुधारणेला नालायक असा पाश्चात्य राष्ट्रांनी पौर्वात्यांवर काय सचा शिक्का मारला असताना, स्टॅलिनला एशियाटिक किंवा पौर्वात्य म्हणवून घेण्यात कमीपणा वाटत नाही. साम्यवादाचा प्रणेता मार्क्स हा ज्यू होता, म्हणून खिती रशियाला साम्यवादाच्या सिद्धान्तात ज्यूपणाची घाण आली नाही. ख्रिश्चन, यहुदी, मुसलमान वगैरे किती तरी जातीचे लोक लोकशाही रशियात आनंदाने नांदत आहेत. पृथ्वीच्या पाठीवर पाय ठेवावयास ज्यू लोकांना आज जागा नसताना लाखो ज्यू रशियात स्वतंत्र आहेत.

भांडवलशाही व जातीय द्वेष हे परस्परावलंबी आहेत. संपत्तीच्या विषम विभागणीत जातीयतेचे मूळ आहे भांडवलशाहीच्या अस्तित्वाला जातीय द्वेष आवश्यक आहे.

लोकशाहीच्या अमलाखाली पैसा हे व्यक्तीच्या महत्वमापनाचे साधन न राहता कार्यक्षमता हेच कारण राहते. खाजगी मालमत्तेच्या अभावी मूर्खलोक महत्वाच्या जागा बळकावू शकत नाहीत व अधिकाराच्या स्पर्धेत योग्यतेला अधिक महत्वाचे स्थान प्राप्त होते भांडवलशाही राष्ट्रात ' यस्यास्ति वित्तं स नरः कुलीनः ' अशी परिस्थिति असल्यामुळे मूर्ख लोक अधिकारारूढ होतात. लोकशाहीत यस्यास्ति बुद्धिः स नरः कुलीनः ' अशी परिस्थिति निर्माण

होते. भांडवलाच्या जागी बुद्धीचा आदेश होतो. संपत्ति भांडवलशाहीच्या कायद्याप्रमाणे आनुवंशिक आहे, पण बुद्धीला आनुवंशिक करण्याचे तंत्र जोपर्यंत शास्त्रज्ञांना अवगत झालेले नाही, तोपर्यंत जेथे बुद्धि आढळेल तेथून ती घेऊन तिचा उपयोग करून घेणे याशिवाय दुसरा मार्गच नाही. मग त्या बुद्धीचा स्वामी ज्यू, मुसलमान, ख्रिश्चन, हिंदु, आर्यन, नीग्रो कोणीहि असो.

साम्यवादी रशियात नाण्याचे जरी अस्तित्व असले तरी भांडवल या नात्याने त्याचे अस्तित्व नष्ट झाले आहे. भोग्य वस्तु सर्व समाजापर्यंत पोहचविण्याचे साधन म्हणूनच त्याला अस्तित्व आहे. भांडवलशाही देशातील नाण्यामध्ये जी क्रयशक्ति आढळून येते ती रशियन नाण्यामध्ये नाही. उदाहरणार्थ पॅरिस, लंडन किंवा न्यूयॉर्कमध्ये कोणीहि भांडवलवाला प्रचंड महाल बांधू शकतो. सुंदर स्त्रियांचा संभोग विकत घेऊ शकतो, सट्टा खेळू शकतो. रशियात अशा प्रकारे द्रव्याचा विनियोग करणे आहेरून जाणाऱ्या भांडवलवाल्याला सुद्धा अशक्य आहे. नाणे म्हणजे प्रजेला आवश्यक असलेल्या वस्तु प्रजेपर्यंत पोहचविण्यासाठी केलेली सोय आहे. ग्रंथकारांना ग्रंथनिर्मितीबद्दल पैसे मिळत नाहीत. नुसत्या लेखनव्यवसायावर लक्षाधीश झालेले लोक जसे भांडवलशाही राष्ट्रांत आढळतात, तसे रशियात आढळणे शक्य नाही. अशी परिस्थिति असून रशियातील प्रचंड ग्रंथनिर्मिति पाहिली म्हणजे आश्चर्य वाटते. नुसत्या पैशाकरिताच लेखक लिहितो हे म्हणणे अत्यंत चुकीचे आहे. कारण भांडवलशाही समाजातसुद्धा पुष्कळ लेखक असे आढळतील की, ज्यांच्यावर लक्ष्मीचा अनुग्रह झालाच नाही. लेखनव्यवसायावर उदरनिर्वाहसुद्धा अशक्य होऊन कित्येकांना आपली प्रतिभा गुंडाळून ठेवावी लागली आहे. एकंदरीत नाण्याकडे पाहण्याचा साम्यवाद्यांचा दृष्टिकोन अगदी नवीन जरी नसला, तरी भिन्न आहे. ज्या सोन्याकरिता महायुद्धात एक कोटी माणसे मृत्युमुखी पडली व कैक कोटी जखमी होऊन जगाला भारभूत झाली,

ज्या सोन्यामुळ राष्ट्राराष्ट्रात वैर माजून आजपर्यंत अकारण प्राणहानि होत आली. त्या सोन्याचे साम्यवादी जगात शौचकूप बनविण्यात यतील अस लेनिनन म्हटल्याच प्रसिद्धच आहे. यावरून साम्य-वाद्याचा दृष्टिकोन लक्षात येण्यासारखा आहे

ही कल्पना हिंदु लोकाना नवीन नाही. संस्कृति ही मानवाच्या आणि परिस्थितीच्या संघर्षातून उत्पन्न झालेली आहे जगाच्या पाठीवर कोठेहि तिच स्वरूप एकच राहणार पौर्वात्य, पाश्चिमात्य हिंदू, मुसलमान. असे संस्कृतीचे भेद करण हे अज्ञानद्योतक आहे वरील कल्पना हिंदु लोकाना नवीन जरी नसली, तरी अशा कल्प नेच व्यापक रीतीन वस्तुस्थितीत रूपातर करण्याचा काळच तेव्हा उद्भवला नव्हता हेच खर.

'द्रव्य तु मुद्रित स्पृष्ट्वा त्रिरात्रेण शुचिर्भवेत्'। मुद्रित द्रव्य म्हणजे नाण शिवल्यानतर तीन दिवसपर्यंत अशौच पाळाव, असा या श्लोकार्धाचा अर्थ आहे. 'धर्मसम्राट् अशोकाने भारतीय अर्थशास्त्र फक्त दोनच वाक्यात सांगितल आहे 'अल्पव्ययः साधु। अल्पभांडता साधु।' फार खर्च न करण चागल, फार धनसग्रह न करण चागल

याच सिद्धातावर प्रकाश पाडणारी एक ग्रामीण दतकथा आहे एका निपुत्रिकेन पुष्कळ नवससायास केले, पण तिला सतति झाली नाही. 'मला पुत्र झाला तर मी त्याची विष्ठा भक्षण करीन' असा तिन नवस केला. योग्य काली पुत्र झाला पण नवस कसा फेडा-यचा? तिन एका धर्मज्ञाचा सल्ला विचारला. तेव्हा त्यान 'एका व्याजावर जगणाऱ्या माणसाच अन्न भक्षण कर' अस सागून तिची सुटका केली.

इंग्लंडमध्ये राष्ट्रीय उत्पन्नाचा हजारावा भाग वैज्ञानिक संशो-धनासाठी खर्च करण्यात येतो, रशियात शभरावा भाग खर्च करण्यात येतो. इंग्लडमधल्या एकाद्या वैज्ञानिकाला जर सरकारी बहु मानाची जागा मिळाली, तर तो आपल्या आयुष्याच कल्याण

झाल असं समजून संशोधनाला कायमचा रामराम ठोकेल. फ्रान्समध्ये सोशॅलिस्ट मुख्य प्रधान ब्लम याच्या कारकीर्दीत नोबेल पारितोषकप्राप्त विदुषी मॅडम ज्यूलियट क्यूरी, हिला 'अंडर-सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर सायंटिफिक रीसर्च' ही जागा देऊन सरकारनं आपला बहुमान करून घेतला. तिच्यानंतर तीच जागा नोबेलपारितोषकप्राप्त जीन पेरॉं यानं घेतली शासनयंत्रातील बहुमानाची जागा पेरॉंनं स्वीकारली, पण त्याकरिता आपल्या वैज्ञानिक संशोधनाला त्यानं तिलांजलि दिली नाही.

रशियातील परिस्थिति याहूनहि संतोषजनक आहे कारण तेथील शासनयंत्रच अत्यंत शास्त्रीय पद्धतीच आहे. 'स्टेट प्लॅनिंग कमिशन' या नावाची वैज्ञानिकांची एक संस्था संबंध राष्ट्राला आवश्यक असलेल्या मालाची यादी करून त्याच्या निर्माणात सतत मदत करीत असते. इतर भांडवलशाही देशांप्रमाणं रशियात विज्ञान म्हणजे माकडाच्या हातातील कोलीत नसून मनुष्याचा दास बनलं आहे. संबंध संशोधनाचा उद्देश मानवाच्या सुखाच्या मार्गातील अडचणी नष्ट करून त्याचं जीवन अधिकाधिक सुखमय बनविणं हाच आहे. नफा कमावणं हा भांडवलशाहीचा हेतु असल्यामुळं व भांडवलशाहीतील परस्परस्पर्धेमुळं, मोठमोठ्या भांडवलदारांनी सवेतन संशोधनार्थ ठेवलेले वैज्ञानिक एकमेकांशी सहकार्य करू शकत नाहीत. नफ्याच्या दृष्टीनं विभक्त राहणं त्यांना आवश्यक असतं. म्हणून एखाद्या वैज्ञानिकानं शोधून काढलेला प्रयोग त्याची कंपनी स्वतःच्या फायद्यासाठी गुप्त ठेवते व तोच प्रयोग पुनः शोधून काढण्यात अनेक वैज्ञानिकांचे परिश्रम व अनेक कंपन्यांचे पैसे व्यर्थ खर्च होतात. आर्थिक फायद्याऐवजी लोककल्याण हा हेतु असल्यामुळं रशियातील वैज्ञानिक परस्परांशी पूर्ण सहकार्य करू शकतात. त्यांना परस्परांच्या संशोधनाचं संपूर्ण ज्ञान असतं, म्हणून श्रम, धन व काल यांचा अपव्यय होत नाही. या संशोधनपद्धतीचं वर्चस्व रशियानं सर्व जगाला पटवून दिलं आहे.

वाविलोव्ह या वैज्ञानिकाने रशियाच्या उजाड प्रदेशात देखील पिकेल अशी एक गव्हाची जात तयार केली आहे. वाविलोव्ह हा रशियातील ' वनस्पति संवर्धन-संगोपन ' खात्याचा अध्यक्ष आहे. त्याने आपल्या प्रयोगशाळेत २४००० गव्हाच्या भिन्न जातींचा संग्रह केलेला आहे. अबिसिनिया, अफगाणिस्थान, दक्षिण अमेरिका इत्यादि देशात प्रवास करून त्याने जे संशोधन केले आहे, त्यावरून मनुष्यजातीच्या आद्यनिवासस्थानाविषयी बरीच विश्वसनीय माहिती मिळू शकते, असे वैज्ञानिकांचे मत आहे. लिसेंको या शास्त्रज्ञाने कृत्रिम रीत्या बीजांना अंकुरित करण्याचा शोध लावून त्याच्या पिकांचे निसर्गाधीनत्व बऱ्याच अंशाने नष्ट केले आहे. या शोधामुळे रशियातील शेकडो मैलांचे नापीक जमिनीचे प्रदेश अत्यंत उपजाऊ बनले. पाश्चात्य सुधारलेल्या राष्ट्रांकडून सुधारणेच्या बाबतीत नालायक ठरविल्या गेलेल्या रानटी रशियनांनी चोवीस वर्षांच्या अवधीत वाविलोव्ह, लिसेंको, सेमेनोव्ह, स्कोबेल्टझीन, जॉफे, क्रमाकिन, तालमुद व सर्वांच्या विशेष परिचयाचा पावलोव्ह, या श्रेष्ठ दर्जाच्या, वैज्ञानिक जगतात मान्यतेस चढलेल्या शास्त्रज्ञांना उत्पन्न करून साम्यवादाचे, लोकशाहीचे प्रभावित्व जगाला पटविले आहे.

नाझीझम्, फॅसिझम्, ही सर्व भांडवलशाहीची विकृत स्वरूपे होत. माणुसकीचा मार्ग सोडून जेव्हा भांडवलशाही आसुरी मार्गाने आपले संरक्षण करू लागते, तेव्हा ती ही विकृत स्वरूपे धारण करते. तर भांडवलशाहीखाली विज्ञानाचे काय स्वरूप आहे याचे परीक्षण करणे अत्यंत बोधप्रद होणार आहे.

ज्याच्या सापेक्षतावादाच्या सिद्धांताने सर्व वैज्ञानिक जगतात क्रांति करून टाकली, त्या नोबेलपारितोषक प्राप्त आईन्स्टाइनला नाझींनी हाकलून दिले. ज्याने हवेपासून विस्फोटक द्रव्य उत्पन्न करण्याचा शोध लावून तब्बल चार वर्षे जर्मनीला जगाविरुद्ध झुंजत ठेवले, त्या नोबेलपारितोषिकप्राप्त हाबेलला जबरीने ख्रिस्ती

वनवून नाझीनी निर्वासित केल. ज्याला १९३० साली फ्रँकफर्ट येथे ' गटे पारितोषक ' देऊन जर्मनीन आपली गुणग्राहकता दाखविली, त्या प्रसिद्ध मानोविश्लेपणशास्त्रज्ञाला–फ्रॉइडला–निर्वासित करून नाझीनी आपल्या मायदेशाच्या ज्ञानपरंपरेला कलंक लावला. नोबेलपारितोषकप्राप्त प्रसिद्ध जर्मन लेखक थॉमस मॅन याला निर्वासित करून नाझीनी आपली अरसिकता जगाच्या चव्हाट्यावर टागली. ज्या प्रसिद्ध जर्मन कवीची भावगीत जर्मन राष्ट्रीय जीवनाच्या रोमारोमात भिनली आहेत व ज्याच्या भावगीताचा नाश जर्मन राष्ट्रीयत्वाच्या नाशाबरोबरच संभवनीय आहे, अशा हीनेच्या भावगीताची जर्मनीला लाज वाटते, म्हणून त्याना प्रसविणाऱ्या अधिष्ठानाचा नामनिर्देश न करताच ती छापण्यात येतात. ज्याच्या सशोधनाच महत्व आइन्स्टाइन किंवा एडिंग्टन यांच्यामारख्या कोणत्याहि महशूर गणितज्ञान लिहिलेल्या सापेक्षतावादाच्या पुस्तकातील नामोल्लेखावरून महज ममजण्यासारख आहे व जो हार्वर्ड विश्वविद्यालयान आपल्या त्रिशताब्दिकोत्सवप्रसगी मन्मानित केलेल्या माठ शास्त्रज्ञ प्रमुखापैकी होता. त्या प्रसिद्ध इटॅलियन गणितज्ञाला– ' लेव्हि मेविटा 'ला नाझीनी ( गणितज्ञानी नव्हे ) एका प्रमुख जर्मन गणितपत्राच्या मपादकीय विभागातून काढून टाकल विज्ञान म्हणजे माडवलशाही–राष्ट्ररूपी नौकेतील कचरा आहे, वादळात नौकेला धोका उत्पन्न झाला की दिला कचरा फेकून !

लोकशाही राशियात कित्येक लेनिन, स्टॅलिन व ट्रॉट्स्की येतील व जातील, पण वैज्ञानिकाच स्थान अढळ राहील. विचारस्वातंत्र्य व क्रियास्वातंत्र्य हे वैज्ञानिकाचे प्राण आहेत, आणि हे जोपर्यंत अस्तित्वात आहेत, तोपर्यंत रशियाला भिण्याच काहीच कारण नाही.

कीट्स व शेले यांच्यासारख्या कविवर्यांना उपासमारीत दिवस काढावे लागले. ' नास्तिकतेची आवश्यकता ' या विषयावर निबंध लिहिल्याबद्दल शेलेला ऑक्सफर्डमधून हाकलून देण्यात आल होत.

दोघेहि तरुणपणींच मरण पावले. कलावंताना सोसाव्या लागणाऱ्या हालअपेष्टा पाहून केंब्रिजचे एक प्राध्यापक म्हणतात,

" आपल्या शासनव्यवस्थेतील काही दोषामुळ आज व अलीकडील दोनशे वर्षांत कवींना कुत्र्याच मरण मराव लागत आहे छातीठोकपणान मी अस म्हणू शकेन की गुलाम शासनव्यवस्थेच्या भरभराटीतल्या अथेन्समधील गुलामांच्या मुलापेक्षाहि शोकजनक परिस्थिति आजच्या इंग्लिश मुलाची आहे. अशा बौद्धिक गुलामगिरीच्या वातावरणातून कलावंत निर्माण होतील अशी आशा करण व्यर्थ आहे.

अप्टन सिंक्लेरसारख्या जगत्प्रसिद्ध लेखकाची प्रारंभीची दैना पाहिली म्हणज भांडवलशाहीत कलेची कुचंबणा कशी होत आहे याच स्पष्ट चित्र डोळ्यासमोर उभ राहत.

प्रो. बर्ग नावाच्या एका रशियन ग्रंथकारान आपल्या पुस्तकात डार्विनचा विकासवादाचा सिद्धांत विशेष महत्वाचा नाही अस प्रतिपादन केल होत बहुतेक रशियन शास्त्रज्ञाना व सरकारी पुस्तक प्रसिद्धि-खात्याला त्याची मत विकासवादाला विघातक वाटली. लेखकाविरुद्ध देशद्रोहाचा खटला चालण शक्य होत तरी त्यानी ते पुस्तक छापून प्रसिद्ध केल.

रशियात कलावंताना स्वातंत्र्य आहे ' कलावंताच स्वातंत्र्य ' याचा अर्थ उदरनिर्वाहाच्या व कलोपासनेच्या साधनाची सुलभ प्राप्ति असाच जर असेल, तर रशियात स्वातंत्र्य आहे. कलेच्या निर्मितीला आवश्यक अस जे शिक्षण ते सार्वत्रिक व निःशुल्क आहे उदरनिर्वाहार्थ एखाद्या गंडकऱ्याला भाजी विकायला लावणारी किंवा एखाद्या भावी न्यायाधीशाला मधुकरी मागायला लावणारी समाजव्यवस्था रशियात नाही. उपासमारी म्हणजे जेथे पाप आहे तेथे कलावंत सुखात नांदत असतील तर काय आश्चर्य ?

लोकशाही सरकारन सतरा कोटी लोकाकरिता सक्तीच प्राथमिक शिक्षण सुरू केल आहे.

उच्च शिक्षणाची केंद्र रशियात,

| | |
|---|---|
| १९१४ साली | ९१ होती |
| १९३३ ,, | ६०० झाली. |

शास्त्रीय संशोधनाची केंद्र,

| | |
|---|---|
| १८२९ साली | ४०० होती |
| १९३४ साली | ८४० झाली |

रशियाची लोकसंख्या,

| | |
|---|---|
| १९१७ साली | १३ कोटी होती, |
| १९३३ साली | १६॥ कोटी झाली. |

एक लाखापेक्षा अधिक लोकसंख्येची शहर,

| | |
|---|---|
| १९१७ साली | २४ होती |
| १९३३ साली | ५० च्या वर संख्या गेली. |

संततीच्या शिक्षणाचा व पोषणाचा भार लोकशाही सरकारवर असल्यामुळ संततिनियमाची जरूर पडली नाही व शास्त्रीय-ज्ञानाच्या वृद्धीमुळ, अनेक रोगानी व औषधाभावी होणारे अप-मृत्यु टळले. लहान मुलांच्या मृत्युसंख्येच प्रमाण हजारास २७ होत ते हजारास बारा झाल मॉस्कोत,

| | |
|---|---|
| १९१३ मध्ये | दरहजारी २३ मरत होते |
| १९३४ मध्ये | १२ ,, |

मध्य अशियात,

| | |
|---|---|
| १९१३ साली | १०६ शाळा व ६२०० विद्यार्थी होते |
| १९३२ साली | ६९७५ शाळा व ७००,००० ,, |

ताजिकिस्तान नावाचा रशियन प्रांत हिंदुस्थानाला अतिशय जवळ आहे या प्रातात,

१९२९ साली १ दवाखाना होता,

१९३२ साली ६१ ,, ३७ दाताचे दवाखाने व सुमारे २१३५ रोग्यांच्या वसतीची सोय होती.

१९२५ सालीं ६ शाळा होत्या.
१९३१ साली २००० ,, झाल्या
व १२०००० विद्यार्थी होते.

शिक्षणाकरिता खर्च झालेली रक्कम,

१९२९-३० मध्ये ८,००,०००० रूबल्स होती,
१९३०-३१ मध्ये २८,०००,००० रूबल्स झाली.

या उदाहरणावरून रशिया जरी सुधारणेच्या बाबतीत जगात अग्रणी नसला, तरी त्यान आपल्या राष्ट्रातील भांडवलशाही नष्ट करून प्रगतिपर अशा असंख्य सुप्त शक्तींना इतकी जबरदस्त चालना दिली आहे की, भांडवलशाही राष्ट्रांना रशियाच्या सुधारणेच्या गतीची भीति वाटत आहे.

बी म्हणजे अंकुर नव्हे, अंड म्हणजे पिल्लू नव्हे, पाणी म्हणजे वाफ नव्हे, भांडवलशाही म्हणजे लोकशाही नव्हे

---

# लोकशाही : : ९

## चीन

भांडवलशाही व दलितवर्ग याच्यामध्ये फूट निर्माण करून, साम्यवादी लोक चिनी राष्ट्रीयतेचा घात करतात, अस वाटून चँग कै-शेक न १९२७ साली साम्यवाद्याना हाकलून दिल व तो भांडवलवाल्याना शरण गेला. साम्यवाद्याना हाकलून देण्याच्या कामी भांडवलवाल्यानी चँगला मदत करावयाच कबूल केल. चँगन नानकिंग येथे राष्ट्रीय सरकार स्थापन केल व साम्यवाद्यानी क्यांगसी येथे आपल सरकार स्थापल. साम्यावाद्याचा नायनाट करण्याकरिता चँग १९२७ पासून १९३४ पर्यंत लढत होता. त्याचे नऊ लक्ष लोक कामी आले पुष्कळ साम्यवाद्याना त्यान स्वर्गाचा रस्ता दाखविला व एकेका साम्यवादी शिपायाला मारण्यास त्याला सरासरी सोळा हजार पौंड खर्च करावे लागले, असा तज्ञाचा अदमास आहे. साम्यवाद्याचा पराभव झाला व चँगला हार जाण्यापेक्षा मग्रब राष्ट्रच्या राष्ट्र जागच हालवावयाच त्यानी ठरविल. अशा तऱ्हेन अर्वाचीन जागतिक घडामोडीत सुप्रसिद्ध असलेली ही ' दीर्घ यात्रा ' सुरू झाली.

अर्वाचीन घडामोडीत नावाजलेली ही ' दीर्घ यात्रा ' ऑक्टोबर १९३४ मध्ये सुरु झाली व नोव्हेंबर १९३५ मध्ये संपली. ही

यात्रा क्यांगसी येथून निघाली व येनान येथे संपली. यात्रेत सुरवातीला एक लक्ष माणसे होती. यात्रेच्या शेवटी अर्धी शिल्लक राहिली. बारा प्रांतातून सहा हजार मैलाचा प्रवास त्याना करावा लागला. काश्मीर ते कन्याकुमारी तीनदा प्रवास केला म्हणजे जेवढ अंतर होत, तेवढ हे अंतर आहे. या प्रवासाला त्याना ३६८ दिवस लागले. तीनश लहान चकमकी व पंधरा मोठ्या सढाया वाटेत त्याना लढाव्या लागल्या. प्रवासात १०० दिवस विश्रांतीचे व २६८ दिवस हालचालीचे होते. दररोजचा सरासरी वेग पधरा मैलाचा पडतो मोठमोठाले युद्धविशारद ही कामगिरी पाहून थक्क होऊन जातात. कित्येक अज्ञात प्रदेशामधून त्याना प्रवास करावा लागला. वाटेत त्यानी अठरा पर्वत ओलांडले, सहा नद्या उत्तीर्ण केल्या व बासष्ठ शहरात मुक्काम केला. रेडिओ, छापखाना व सरकारी कागद त्यानी बरोबर ठेवले होते. चँगला वाटत होते, ही दीर्घयात्रा म्हणजे साम्यवाद्याची प्रेतयात्राच होईल, पण ती जवळजवळ चॅंगचीच प्रेतयात्रा ठरली.

साम्यवाद्यानीच अति दूर अशा शेन्सी प्रांतात आपली सत्ता स्थापन केली. चॅंगन साम्यवाद्याचा नाद सोडला. १९३६ साली चॅंगला त्याच्या शत्रूनी पळविल. चॅंग साम्यवाद्याच्या हातात सापडला होता. पण त्यानी चॅंगला सोडून दिल. ज्याची हजारो माणस चॅंगन अकारण मारली व ज्याच्या बाधवाना चॅंगन देशोधडीस लावल, त्याच साम्यवाद्यानी, चँग हातात सापडला असता त्याला प्राणदान दिल. या घटनेचा चॅंगच्या मनावर परिणाम होऊन त्यान साम्यवाद्याचा विरोध करण सोडून दिल व आज परकीय सत्तेला बाहेर घालविण्यासाठी चॅंगच्या खाद्यास खादा लावून साम्यवादी चीन जपानी साम्राज्यशाहीशी लढत आहे. साम्यावादी चीनचा पुढारी माव-त्से-तुंग याची तुलना तज्ञ लोक लेनिनबरोबर करतात. मावन लंडन टाइम्सला दिलेला सदेश फारच मननीय आहे.

“ आमच्या राज्यात प्रत्येक मनुष्याला पोटभर अन्न व अंगभर

वस्त्र लाभत. प्रत्येक मनुष्याला आपल्या कर्तव्याची व हक्काची जाणीव आहे. प्रत्येकाला शिक्षणाची संधी मिळते. विवाहाच्या पद्धतीत सुधारणा करावयाची आहे, सडका बांधावयाच्या आहेत व मजूर वर्गाकरिता आठ तासाचा दिवस नियत करावयाचा आहे. परकीय किंवा स्वकीय कोणत्याही प्रकारच आक्रमण आमच्या येथे नाही सर्व स्वतंत्र आहेत. अशाच मार्गाने विश्व-शांति प्रस्थापित होईल असा आमचा विश्वास आहे. '

दुसऱ्या ठिकाणी तो म्हणतो, ' परकीय आक्रमणाखाली दड-पल्या जाणाऱ्या लोकाच क्रांति हे मुख्य ध्येय नसून परचक्रनिवा-रण हेच मुख्य ध्येय आहे. आम्ही ज्या देशात राहतो तो देशच जर परतंत्र झाला, तर साम्यवाद स्थापण तर लांबच. पण त्याची चर्चासुद्धा करण आम्हाला शक्य होणार नाही. '

आपसातील लढाया बंद करून, चँग परकीय आक्रमणाविरुद्ध लढेल, या दूरदर्शी विचारानच साम्यवाद्यानी चँगला सोडून दिल व चँगन आपल्या प्राणदानरूपी उपकाराची परतफेड चिनी राष्ट्राच ऐक्य करून, ऱ्याच अशी केली आज जपानी साम्राज्य शाहीचा नं. १ चा शत्रु चँगच आहे.

चीनच्या एकचतुर्थांश भागावर आज साम्यवादाचा अम्मल गाजत आहे साम्यवादी चीनची लोकसंख्या आठ कोटी आहे प्रत्येकाला पोटभर अन्न व अंगभर वस्त्र पुरविण हे साम्यवादी सरकारच आद्य कर्तव्य आहे. वर उद्धृत केलेल्या, ' माव् ' न टाइम्सला दिलेल्या संदेशाप्रमाण आठ कोटी लोकांपेकी प्रत्येकाला शिक्षणाची व आत्मोन्नतीची संधि देण्यात येते. साक्षरतेच प्रमाण इतर चीनपेक्षा किंवा चँगच्या अमलाखालील चीनपेक्षा कितीतरी अधिक आहे. साम्यवादी लोकशाही सैन्यात शेकडा चाळीसपेक्षा अधिक शिपाई साक्षर आहेत. कोमिटाँग चीनच्या, चँगच्या चीनच्या सैन्याला साक्षरतेचा गंधसुद्धा आहे किंवा नाही याची वानवाच आहे. रशिया व केमाली तुर्कस्थान याच उदाहरण पाहून

लोकशाही चीनचे पुढारी चिनी लिपीच्या रोमनीकरणाचे प्रयत्न करीत आहेत. जमीनदारीचा नाश होऊन मध्यमवर्गीय व गरीब शेतकऱ्याच्या मालकीची जमीन झाली आहे. स्त्रीशिक्षण, स्त्रीस्वातंत्र्य साक्षरता, वर्तमानपत्र इत्यादि बाबतीत साम्यवादी चीनने अत्यंत प्रशंसनीय प्रगति केली आहे. ' एट्थ रूट आर्मी ' या नावाने प्रसिद्ध असलेले लोकशाही चीनचे सैन्य–गोरीला वॉरफेअर–गनीमी काव्यात अत्यंत निपुण आहे. कोमिटॉंग चीनमध्ये अफूला बंदी नाही उलट ' मार्क्स म्हणतो, धर्म ही लोकांची अफू आहे, पण चीनमध्ये अफू लोकांचा धर्म आहे. ' अफूमुळे होणाऱ्या असंख्य दुष्परिणामामुळे जपानी लोक दुष्टपणाने चीनच्या विजित प्रदेशातून अत्यंत स्वस्त दराने अफू पुरवून चिनी लोकांना या भयंकर व्यसनाच्या खाईत लोटतात लोकशाही चीनमध्ये अफूला सक्त मज्जाव आहे.

दूरदर्शित्व व मुत्सद्दीपणा या गुणाचा माबच्या ठिकाणी इतका उत्कर्ष झालेला आहे, की त्याची तुलना तज्ञ लोक लेनिनशी करतात. चू टे हा लोकशाही चीनचा सेनापति आहे. वेलिंग्टन, ग्रँट व ली अशा जगत्प्रसिद्ध सेनापतींबरोबर त्याची तुलना केली जाते या दोघाचा पगार जेमतेम पधरा रुपये महिना पडतो !

मार्च महिन्याच्या रशियन क्रांतीत किंवा फ्रेंच क्रांतीत जसे प्रजेकडून अत्याचार झाले, तसे या चिनी क्रांतीत झाले नाहीत, हेच या क्रांतीचे विशेष होय लोकशाही सैन्याच्या व चँगच्या भाडवलशाही सैन्याच्या पुष्कळ लढाया झाल्या व त्या लढाया मधून उभयपक्षाचे कल्पनातीत नुकसान झाले. पण याचा दोष लोकशाही सैन्याकडे आहे असे म्हणणे असमंजसपणाचे होईल चँगने केलेल्या पाठलागामुळे साम्यवाद्यांना आपली मातृभूमि सोडावी लागली इत्यादि वृत्तांत वर आलाच आहे चीनच्या वायव्येकडील शेन्सी प्रांतात त्यांनी आपला जम बसविला शासक समंजस असले म्हणजे क्रांति शांतीने कशी घडून येते, याचे

उत्कृष्ट उदाहरण म्हणजे चीन होय. नवप्रसूति ज्याप्रमाणे कष्टप्रद असते त्याप्रमाणे रशियन क्रांति कष्टप्रद झाली इतःपर होणाऱ्या क्रांत्या केव्हाहि अनुभवामुळे कमी कष्टप्रद होतील हे उघड आहे

———

# उपसंहार : : १०

यांत्रिक प्रगति, तज्जन्य साम्राज्यतृष्णा, तीपासून होणारी जागतिक महायुद्ध, कोट्यवधि युध्यमान व अयुध्यमान जनतेची प्राणहानि, अलोट संपत्तीचा अपव्यय, इत्यादि युद्धजन्य आपत्ती पाहून वैतागाच्या क्षणात 'नको ही सुधारणा' असं मानवी मनास वाटल्यास नवल नाही. चरखा, खादी, पॅसिफिझम् इत्यादि ज्या काही चळवळी आहेत, त्यांचा उगम हा वैतागाचा क्षण आहे

यालाच मानसशास्त्राच्या भाषेत ' कॉंपेन्सेटरी इन्स्टिंक्ट ' असं म्हणतात. युद्ध थांबविण्यासाठी काहीहि करणं शक्य नाही, या मनोवृत्तीपासून पॅसिफिझम्‌चा जन्म झाला. मँचेस्टरनं चालविलेली लूट बंद करणं शक्य नाही, या मनोवृत्तीतून खादीचा जन्म झाला. व्हर्सायच्या तहाच्या जाचक अटी लादणाऱ्या राष्ट्रांना जाब विचारण्याचा दम नव्हता म्हणून आपला राग हिटलरनं ज्यू लोकांवर काढून घेतला. पण अशा ढोंगांनी खरी कारणं लपत नसतात.

प्रगतीचा प्रवाह हा निश्चित दिशेनं चालला आहे. निसर्गापासून मनुष्य दुरावत चालला आहे. निसर्गाला आपला सेवक बनविण्याचे त्याचे प्रयत्न बरेच सफल होत आहेत. ऐहिक सुखाकडील लोकांची प्रवृत्ति बळावत चालली आहे. ज्ञात जगाचं मर्यादित क्षेत्र मानवी पराक्रमाला संकुचित वाटू

लागल आहे. विमान, रेडिओ, टेलेफोन, टेलेव्हिजन इत्यादीनी या अफाट जगाला अतिशय संकुचित करून टाकल आहे. आयुर्वृद्धि, पुनर्यौवनलाभ, दीर्घजीवित्व इत्यादि मृत्युलोकच्या मानवान मनाशी बाळगलेल्या आशा आज शक्यतेच्या मर्यादेत येऊन प्रयत्नार्ह वाटत आहेत. कालिदासाच्या शब्दात ' महीतलस्पर्शनमात्रभिन्न ' असा प्रतिस्वर्गच भूतलावर तयार होत असताना, वैतागून ' बॅक टु नेचर ', ' निसर्गाकडे चला ' अस म्हणणाराच्या शब्दाला कोण किंमत देईल !

प्रगतीचा प्रवाह हा एकदिशावलंबी आहे, अस निसर्गातील अनेक उदाहरणावरून स्पष्ट होण्यासारख आहे. बी, अंकुर, रोपट, झाड, वृक्ष आणि वृक्षापासून पुनः बी हे वनस्पतींच सामान्य विकासवर्तुळ आहे वीर्यापासून गर्भसंभव, जन्म, बाल्य, तारुण्य व पुनः गर्भसंभव हे प्राण्याच विकासवर्तुळ आहे. हा मार्ग एकदिशा-वलंबी आहे. अंकुरापासून बी किंवा रोपट्यापासून अंकुर उत्पन्न होणार नाही. अंकुराच बी होण्यासाठी विकासवर्तुळाचा सबंध प्रवास पूर्ण झाला पाहिजे.

बहुतेक प्राण्याच्या व वनस्पतींच्या विकासाचे मार्ग एकदिशा वलंबी जरी असले तरी निसर्गात याला मुळीच अपवाद नाही अस नाही. वृद्धावस्थेतून बाल्यावस्थेत जाणारे, ' द सेम रूट नॉट टु बी ट्रॅव्हल्ड ट्वाइस ', 'एकाच मार्गाने दोनवेळा प्रवास करू नये' हा जीवनरूपी झोनतिकीटाचा नियम मोडणारे, विकासमार्गावरून उलटे जाणारे बंडखोर प्राणी जगात आहेतच. पण ते इतके थोडे आहेत, की ' नियमाला अपवाद असतो ' या इंग्रजी म्हणीची सत्यता पटवून देण्यासाठीच त्याचा अवतार झालेला आहे अस वाटत. एकंदरीत जगात ' वन् वे ट्रॅफिक '– एकदिशावलंबिता हाच नियम आहे. जन्म हे प्रवेशद्वार व मृत्यु हे बाहेर जाण्याच द्वार आहे.

मानवसमाजाच्या प्रगतीचा मार्ग वर्तुळाकार आहे किंवा सर्व-

साधारण नियमाला अपवादभूत आहे हे निश्चयान मागण्याइतक अजून काहीच घडलेले नाही. इतर प्राणी व वनस्पति यांच्या वर्तुळावर विकासमार्गाची उदाहरण ही अनुभवजन्य आहेत. मानवसमाजाच विकासवर्तुळ जोपर्यंत पूर्ण झाल नाही, तोपर्यंत तद्विषयक विधान ही अनुमानच आहेत.

बहुसख्य मानवाची मनःप्रवृत्ति हे एकच साधन मानव समाजाच्या प्रगतीची दिशा दाखविण्यासाठी शिल्लक राहिल आहे. यंत्रयुगाचा मानवजातीला वीट आल्याची किंवा यंत्रसंन्यासाची संपूर्ण तयारी असल्याची चिन्ह अजून काही दृष्टोत्पत्तीस येत नाहीत. म्हणून निकट भविष्यात तरी यन्त्रसन्यासाचे विचार मनुष्याचे डोक्यात येतील अस वाटत नाही. जवाहरलाल नेहरूनी म्हटल आहे, ' आपण पाठीमाग जाऊ शकत नाही व या प्रगतिशील जगात अगतिकहि राहू शकत नाही. '

भौतिक शास्त्राच्या साहाय्यान निसर्गाला यथेच्छ राबवून सुखसमृद्धीत लोळत बसण्याची महत्वाकांक्षा मानवजातीला आहे. महत्वाकांक्षेपासून तीव्र असंतोष उद्भवतो. अप्राप्तवस्तूची आकांक्षा तीव्र असंतोषास कारणीभूत होते असतोष हा कार्यप्रवृत्तीस जन्म देतो. " असंतोषः श्रियो मूलम ' अस एक सस्कृत सुभाषित आहे. असंतोष सपत्तीला कारण होतो सपत्तीची आकांक्षा असतोषास कारणीभूत होते, असतोष व आकांक्षा याच्या कधी न सपणाऱ्या पाठशिवणीच्या खेळामुळ जगताला जगतत्व येत. असतोष प्रगतीला कारण होतो, प्रगति असतोषाला कारण होते. असतोषरूपी मनाच्या सार्वत्रिक विकारावर ससाराची गति अवलबून आहे. ससार गतिमय आहे, म्हणूनच असंतोष टिकाव धरून आहे. मोक्षसाधकाचा सतोष हा गुण आहे. संसारी मनुष्याचा तो दुर्गुण आहे. संतोष हा साधूचा प्राण आहे, ससाऱ्याचा तो घात आहे.

' असतुष्टा द्विजा नष्टाः सतुष्टाश्च नराधिपाः ।।" या सुभाषितात हेच सुचविल आहे „ मनुष्य संतुष्ट झाला की, त्याचा ससाराशी

संबंध सुटला. जनकराजा अष्टैश्वर्य भोगत असून, संसारी नव्हता. कारण तो संतुष्ट होता. कौपीनधारी दिगंबर शुकदेव अठराविश्वे दारिद्र्य उपभोगत असून सुद्धा जनकाचा उपदेश ग्रहण करण्यापूर्वी संसारीच होता, कारण तो असंतुष्ट होता. सोळासहस्र गोपींशी संसार करणारा श्रीकृष्ण मुक्त होता व भरतराजा संन्यस्त असून, संसारी होता.

याच सिद्धान्तावर प्रकाश पाडणारी एक ऐतिहासिक कथा आहे. राजा अलेक्झांडर एका विरक्त साधूस भेटण्यासाठी गेला असता, ' आपण राजाच्या स्वागतार्थ सामोरे जावे किंवा नाही ' असा त्या साधूस प्रश्न पडला. राजा मोठा की मी मोठा ' असा विचार मनात येऊन किंकर्तव्यविमूढ होऊन तो निश्चेष्ट झाला. त्याच्या मनाचा गोंधळ पाहून अलेक्झांडर म्हणाला, ' तुझ्या सतरा ठिकाणी फाटलेल्या वस्त्राच्या छिद्रांतून तुझा अहंकार डोकावत आहे ' ( प्राइड इज् पीपिंग थ्रू द होल्स ऑफ युवर जॅकेट )

चांगदेवाने ज्ञानेश्वराला पत्र लिहावयाचे ठरविले. नमस्काराने पत्राला आरंभ करावा तर ज्ञानेश्वर वयाने लहान, आशीर्वादाने करावा तर अधिकाराने मोठा ! शेवटी कोराच कागद चांगदेवाने पाठवून दिला ! त्याचे उत्तरहि तेच आले. शेवटी चौदाशे वर्षे तप करून चांगदेव कोराच म्हणजे मोक्षाला नालायक होता कारण त्याचा अहंकार.

मोक्ष आणि संसार या मनाच्या वृत्ती आहेत.

मानवसमाज जितका सुखलोलुप असेल तितकीच दुःखे त्याच्या माग लागतील. जेथे बारा तासाचा दिवस असतो तेथे बारा तासाची रात्र असते. जर कोणी सहा महिन्याचा दिवस असतो म्हणून उत्तर ध्रुवाकडे गेला तर सहा महिन्याची रात्रहि तेथेच असते हे त्याला लक्षात ठेवावयास पाहिजे. ब्रिटिशसरकारच्या राज्यावर सूर्य मावळत नाही हे जसे सिद्ध करता येते, तसेच उगवत नाही हेहि सिद्ध

करता येईल' शोकपर्यवसायी व आनंदपर्यवसायी असे नाटकाचे दोन प्रकार जरी मानवान कल्पिले असले, तरी प्रत्येक नाटकात आनंदाचा व शोकाचा भाग बरोबरच असतो.

मासि मासि समा ज्योत्स्ना पक्षयोरुभयोरपि ।
तत्रैव शुक्लपक्षोऽभन् यशःपुण्यैरवाप्यते ॥

शुक्लपक्षात व कृष्णपक्षात चांदण सारखच पडत, पण एकाला आपण शुक्ल म्हणतो व दुसऱ्याला कृष्ण म्हणतो.

सुखदुःखविरहित अशा शांति कशी प्राप्त होईल ? जेव्हा हे सुखदुःखाच मूळ नष्ट होईल तेव्हा. सुखदुःखाच मूळ म्हणजे इच्छा, असंतोष. इच्छेचा नाश म्हणजे सुखदुःखाचा नाश सुखदुःखाचा नाश म्हणजे संतोषप्राप्ति, म्हणजेच मुक्ति.

गणितशास्त्राच्या भाषेत बोलावयाच झाल तर,

| | |
|---|---|
| सफल झालेल्या इच्छा / मनाच्या आकांक्षा | या अपूर्णांकाच्या मूल्यावर सुख, दुःख, मुक्ति इत्यादि अवलबून राहतील. |

मनाच्या आकांक्षा पुष्कळ असतील व सफल थोड्या झाल्या असतील तर या अपूर्णांकाच मूल्य एकाहून कमी राहील. अशा परिस्थितीत मनाला दुःख होईल.

मनाच्या आकांक्षा सर्वच सफल झाल्या असतील तर या अपूर्णांकाच मूल्य एक होईल, व सुखाच दुःखात व दुःखाच सुखात संक्रमण होण्याच्या बिंदूवर मनुष्य राहील.

मनाच्या आकांक्षा थोड्या असतील व अपेक्षेपेक्षा यशाच माप त्याच्या पदरी अधिक पडल असेल, तर तो निश्चितपणे सुखी होईल. या परिस्थितीत अपूर्णांकच मूल्य एकाहून अधिक राहील.

मनाच्या आकांक्षा काहीच नसतील म्हणजे शून्य असतील तर या अपूर्णांकाची किंमत अनंत होईल. याच स्थितीला मोक्ष असं नाव आहे.

ह्या अपर्णा हे { एकापक्षा कमी असल्यास दुःख,
एकाबरोबर असल्यास सुखदुःख समान,
एकापक्षा अधिक असल्यास सुख,
अनंत असल्यास मोक्ष.

सर गोपाळकृष्णननी एके ठिकाणी म्हटले आहे ' असंतुष्ट लोकच जगाच्या प्रगतीला कारणीभूत होतात ' भारतीयतत्त्वज्ञानगंगेत अवगाहन करून शुद्ध झालेल्या सर साहेबानी ' असंतोष किंवा मुळास पक्षा अधिक काय सांगितले ?

भौतिक शास्त्राने निर्माण केलेली ही प्रचंड यंत्रे मानवजातीच्या सुखासाठी राबविण्याची धमक वर्तमान समाजव्यवस्थेत नाही उत्पादनाच्या साधनाप्रमाणे समाजातहि फरक होत जातो हा बदल होणे म्हणजेच वर्तमान सत्ताधारी वर्गाची सत्ता जाऊन नवीन वर्गाच्या हाती सत्ता येणे म्हणून ज्या उत्पादनाच्या नवीन साधना-मुळे समाजात क्रांति आवश्यक होते, त्या साधनाची गळचेपी करणे व आजचे मरण उद्यावर ढकलणे हे भांडवलशाहीचे तंत्र होऊन बसले आहे.

जगताची गति, संसाराची सृति, नाहीशी करणे म्हणजे पाण्याचे प्रवाहित्व, अग्नीची उष्णता किंवा पदार्थाचे स्थलव्यापकत्व नाहीसे करण्यासारखे आहे. ज्या धर्मामुळे त्याचे अस्तित्व आपल्याला जाणवते ते धर्मच त्याचे नष्ट झाल्यावर जगत् जगत् कसले व संसार संसार कसला ?

जगातील अब्जावधि लोकाना पुरून उरण्याइतकी अन्नसामग्री असताना कोट्यवधि लोकाची उपासमारी, सर्वांना अगदी स्मशान यात्रेच्या कफनीपर्यंत पुरेल इतके कापड असताना कोट्यवधि लोकाची नग्नप्राय दशा, इत्यादि विरोधामुळे भांडवलशाहीचा अंत पाहण्यास आसुसलेली दलित जनता व सर्व सिद्धी अवगत असताना केवळ सत्ताधाऱ्याच्या मूर्खपणामुळे होणारी पीडापीड पाहून संतप्त झालेली सात्विक जनता केव्हा बदलेल व केव्हा भांडवल-

शाही लयास जाईल याचा नेम नाही.

या नव्या युगाचे उद्घाटन रशियातल्यासारखे लाल क्रांतीने होईल किंवा चीनसारखे सामोपचाराने होईल. सशस्त्र क्रांतीने होईल की अशस्त्र क्रांतीने होईल, विळ्याकोयत्याखाली होईल की तिरंगी झेंड्याखाली होईल, या प्रश्नाचे उत्तर इतिहास, काल परिस्थिति इत्यादींवर अवलंबून राहणार. परंतु मानवजातीला ऐहिक सुखाच्या शिखरावर नेऊन बसविणाऱ्या ज्या प्रचंड शक्ती भांडवलशाहीच्या जुलमामुळे दडून बसल्या आहेत, त्यांचे विमोचन भांडवलशाहीच्या नाशाशिवाय होणे शक्य नाही हे निर्विवाद आहे.